


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका

# दीपावली

साहित्य ★ कला ★ संस्कृति

सप्टेंबर ६५
वर्ष २१ वें
मूल्य १ रु.




## श्रेयनामावली—

• **आम्हीं असें लिहितो :– प्रा. वसंत कानेटकर**–मुलाखत–**प्रभाकर अत्रे.** • **शिबा राणीच्या शोधांत**:–[ काव्य आणि तत्वज्ञान यांचा अपूर्व संगम घडविणारें अखेरचें प्रकरण ] **दिलीप पु. चित्रे.** • **देवाला डोळे असतात**:–( चालूं कादंबरी ) अनुवादक–**प्र. श्री. नेरूरकर.** • **जिलबी कुठें आहे ? :**–( उपहासगर्भ एकांकिका ) **भास्कर कविमंडन.** • **तीन आगळ्या व वेगळ्या ढंगाच्या कथा**:–भेटायचें ठरवून, भेटायला जाऊनही तीं एकमेकांना भेटलींच नाहींत, कां ? ( **किती रंगला खेळ–श्रीकान्त पुरोहित** ), डोळ्यांनीं जें गेलें, तें सुरांनी साधलें (**जीवनाची सरगम–कमलाकर धारप** ), रघु प्रेमांत पडतो–आणि त्याचा "सर्वोदय" होतो [ खुमासदार विनोदी किस्सा–**रघु प्रेमांत पडतो**–त्याची एक राजकीय झलक–**राजा राजवाडे** ] • **यावे नाचत गौरीबाळा** ( कविता ) (संग्राहिका–**डॉ. सरोजिनी बाबर**)

–– शिवाय ––

सन्मानपुष्पें, दीपमाला, ऐसी अक्षरें, पानपुरी वगैरें नेहमींची सदरें, भरपूर व्यंगचित्रें, पानन् पान वाचनीय !!


दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५
Gram : Dalalart

❁ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचीहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.





Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40–42, Kennedy Bridge, Bombay – 4.


भारत सरकारचें १९६५ चें श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक








**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४,
टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टु डओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येते.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# सैतान मोकाट सुटला आहे

**सैतान** मोकाट सुटला आहे. मांगल्यावर, माणुसकीवर, माणसांतल्या देवत्वावर, स्त्रीच्या सतीत्वावर, जीविताच्या प्रेम, दया, वात्सल्य, त्याग, समर्पणादि मुल्यांवर, नीतीवर, शुचितेवर, जगा आणि जगूं द्या ह्या सामान्य जीवनदृष्टीवर श्रद्धा नसलेला सैतान आज मोकाट सुटला आहे. त्याच्या हातीं विध्वंसाचीं शस्त्रें आहेत. अणुबॉम्ब आहे. बंदुका, तोफा, उखळी तोफा आहेत. तोंडांत अभद्र वाणी आहे. मस्तकांत विनाशाचा कैफ आहे. जगांतलें सुंदर त्याला असुंदर भासते. त्याला झिंग आली आहे. स्वामित्वाच्या कल्पनेची झिंग आली आहे. कुणीतरी ती त्याच्या डोक्यांत कोंबली आहे. आणि म्हणून तो निघाला आहे. जिकायला कांहींतरी ! पण जिकणारे थकले, परत गेले. कारण जें जिंकतां येत नाहीं असें कांहीं तरी 'अ जे य' ह्या भूमींत आहे हें त्यांच्या ध्यानीं आलें. आणि तरीही आज सैतान पुन्हा पेटून उठला आहे. माणसाला जिकायला, माणसांना मारायला, माणसांतल्या देवत्वाला पराभूत करायला निघाला आहे. अमंगलाची नांदी हिमराजाच्या साक्षीनें गायिली जात आहे. अशुभाचा चौघडा काश्मीरच्या सीमेवर झडत आहे. आसामच्या टेकडयांतून, नागा प्रदेशाच्या घनदाट झाडींतून, कच्छच्या रणांतून, लडाखच्या डोंगर कपाऱ्यांतून, तिबेटच्या लामांच्या धर्ममठांतून आज विनाशाचा धुरळा उडवीत सैतानाची घोडदौड चालली आहे. "या मरायला सिद्ध व्हा. सर्वस्व द्या". अशी मागणी करीत तो खदखदून हंसत आहे. देवांचीं मंदिरें आणि संतांचे मठ त्यानें उध्वस्त केले आहेत. सैतान मोकाट सुटला आहे.

**सैतान मोकाट सुटला आहे.** पण असेंच वारंवार घडत आलें आहे. तें नवीन नाहीं. अतर्क्य नाहीं. "पूर्वींपासुन अजुनि सुरासुर तुंबळ संग्रामाला करिती" हेंच खरें आहे. सुर आणि असुर, दानव आणि मानव, देव आणि सैतान, सुष्ट आणि दुष्ट ह्या दोन प्रवृत्ति आहेत. आणि त्यांचें द्वंद्वही सनातन आहे. असुर प्रवृत्तींचा जयजयकार वाढला कीं, धर्माला ग्लानी येते आणि धर्माला ग्लानी आली कीं, देव अवतार घेतो असें म्हणतात. तसें त्याने गीतेंत वचन दिलें आहे. असुरांना भिऊन जगूं शकत नाहीं. सैतानाला भिऊन सतीत्व जगणार नाहीं. विध्वंसाच्या डरकाळ्यांना भिऊन मानवी वा दैवी मुल्यें जगणार नाहींत, असुंदराचें आव्हान स्वीकारल्यावांचून सुंदराला स्वामित्व गाजवितां येणार नाहीं. सैतानाला मोकाट फिरूं देऊन 'देवत्व' जगणार नाहीं. सतींसाठीं समर्थ हात हवेत. सुंदरासाठीं सुदर्शन चक्र हवें. धर्मासाठीं सुद्धां कधींतरी 'नरो वा कुंजरो वा' असें म्हणणारा अधर्म हवा. देवळांच्या रक्षणासाठीं कृपाण हवें. आणि ह्या साऱ्यांसाठीं परमेश्वराचें अधिष्ठान हवें. सत्कार्याला संतांचा आशिर्वाद हवा. आज सैतान मोकाट सुटला आहे.

सैतानाचें आव्हान स्वीकारलें पाहिजे. धर्म नाकारतां येत नाहीं. अमंगलाचें अधिष्ठानच उखडून टाकण्याचें हें आव्हान आहे. गणेशजी येत आहेत. मूषकराजांवर मिरवीत येत आहेत. हातांत कमळही आहे आणि शस्त्रही आहे. मंगलासाठीं कमळ आणि अमंगलाच्या विध्वंसनासाठीं शस्त्र ! 'विघ्नहर्ता' हें तर त्यांचें बिरुद ! आज सर्वत्र 'धर्म' संकटांत आहे, हें गाऱ्हाणें त्यांच्या कानीं घालूं या! पण माहितीसाठीं! पण आपण काय त्यांना माहिती देणार ? असुरशक्तीच्या निर्दाळणाच्या आपल्या कार्यांत उत्साह देण्यासाठींच तर ते येताहेत. त्यांच्या शुभाशिर्वादानेंच हा संगर आपण जिंकूं शकूं. ते 'गणाधीश' आहेत. सेनापति आहेत. आपण सैनिक आहोंत. समर्थ भक्तच समर्थ 'देव' निर्माण करतात. दुबळ्याचा देवही दुबळा असतो. आम्हीं 'समर्थ' आहोंत. आमची 'श्रद्धा' मोठी आहे. मरूनही चिरंजिवित्व देणारी ही भूमी आहे. अशी अनेक 'सैतानी' आव्हानें तिनें पचविली आहेत. आणि गणरायांच्या साक्षीनें व आशिर्वादानें हेंही आव्हान आम्हीं पचवूंच पचवूं !

गणराया या ! सैतान मोकाट सुटला आहे. 'काली'चें रूप आणि 'दुर्गे' चे सशस्त्र हात आम्हांला द्या. अग्नीची दाहकता द्या. पंचमहाभूतांवर स्वामित्व गाजवितां येईल अशी शक्ति द्या. आणि 'अशुभाचा वारा । न लागो राजसा' असा आशिर्वाद द्या ! !

**—संपादक**












अनुक्रमणिका

**तिनें कांचेतून ग्रहण पाहिलें आणि तिनें दृष्टि आणि प्रियकर गमावला.**
**—तिनें सूर छेडले. रागरागिणी आळवली आणि....**



—कमलाकर धारप

"हा श्याम मनोहर माझा," कुठल्याशा गाण्याच्या ओळी गुणगुणत कुसुम घरांत शिरली.

या घटकेला खरोखर ती फार खुषीत होती. अतीव आनंदानं तिचा देह पिसा-सारखा हलका झाला होता व जवळजवळ तरंगतच ती घरी आली होती. तसं पाहिलं तर तिला हर्ष व्हावा असं विशेष कांहीं घडलं नव्हतं, पण जे कांहीं घडलं होतं त्यानें तिच्या भावना पालवल्या होत्या. तिच्या मनांत आकार घेत असलेली प्रणयभावना आज अचानकच पूर्णत्व पावून तिच्या अंतर्यामांत प्रकट झाली होती व ती आविष्कृत कशी करावी हें तिचें तिलाच समजेनासें झालें होतें.

ती घरांत शिरली तरी तिचें मन मागेंच रेंगाळत होतें. हातांतील पुस्तकें तिनें कशीबशी टेबलावर ठेवली व स्वत:भोवती गिरकी घेत, क्षणापूर्वी ज्या ओळी गुणगुणत ती घरांत शिरली होती, त्याच ओळी पुन्हा पुन्हा घोळवीत, ती बाजूच्या जिन्यानें वर जाऊं लागली.

"आज ताईसाहेबांची स्वारी जरा खुषीत दिसते आहे ! क्या बात है," जिना उतरत असलेल्या मंदानें तिची वाट अडवीत तिला विचारलें.

"कसची बात ? रोजचीच बात," तिच्या प्रश्नाला टाळीत व तिला चुकवीत कुसुम म्हणाली.

"रोजचीच बात आहे, तर चेहऱ्यावर हा आनंद कसला उतु चाललाय ?" तिचे दंड धरून तिला हलवीत मंदा म्हणाली.

"मंदा, हा काय फाजिलपणा चालवला-यस. सोड मला. इकडे माझा जीव चालला आहे आणि तुला थट्टा सुचते आहे." कुसुम तिचे हात झटकून टाकीत जिना वर चढत म्हणाली.

"हा जीव असा येथून जायला फार सोकावला आहे ग. जातो तरी कुठे तो विचारा !" तिच्या बरोबर जिना चढत मंदा म्हणाली.

"जातो मसणांत," कुसुम जरा चिडूनच म्हणाली, व घाईतच आपल्या खोलीत शिरली.

एकूण तुला माझ्यापासून सारं लपवून ठेवायचं आहे," मंदा कमरेवर हात ठेवीत नाटकी स्वरांत म्हणाली, "पण तूं किती लपविलें तरीहि, मला नकळत कळते, पाकळचांत दडलें तरी गंधांतून गूढ उकलते."

"वा, आज ही काव्यगंगा अचानक कशी काय वाहूं लागली," कुसुम म्हणाली. तिला मंदाच्या बोलण्याचा रोख कळला होता. तिच्या मनांत जें होतें, तेंच बाहेर काढण्याचा मंदाचा डाव तिच्या ध्यानांत आला होता. पण तरीहि तिला किती महिती आहे हे जाणून घेण्यास ती उत्सुक होती .

"ही काव्यगंगा या घरांत आपणच आणली ताईसाहेब," नाटकीपणा कायम ठेवीत मंदा म्हणाली, "मघा घरांत शिरतांना 'हा श्याम मनोहर माझा' हे गाणं कोण गुणगुणत होतं?"

"मीच."

"ह्या गाण्यांतला हा श्याम मनोहर कोण ग ?"

मंदाच्या त्या सरळ हल्ल्यानें कुसुम गांगरली. ह्या मंदीला सारं कळलं तरी कुठून ? कां हीसुद्धां माझ्याकडून सारं गुपित बाहेर काढण्याची तिची युक्तिच आहे ? क्षणभर तिला कांहीं सुचेना. तेव्हां मौनं सर्वार्थ साधनम् असा विचार करून ती गप्प राहिली.

पण ती गप्प राहिली तरी मंदा थोडीच चूप राहणार होती ! ती म्हणाली, "मी तुला विचारते आहे कुसमे ? आतां कां वाचा बसली ?"

"छे: छे: वाचा बसायला काय झालं ? तुझा कल्पनावारूवरचा प्रवास अगदीं स्वैर चालूं दे. मी ऐकते आहे."

"हा श्याम मनोहर माझा कोण असावा," संशोधन करीत असल्याचा आव आणीत मंदा म्हणाली, "तूं एम. ए.च्या दुसऱ्या वर्षाला आहेस नाहीं कां ? "

"हो, पण त्याचं इथें काय ?"

"त्या वर्गावर मनोहर श्यामराव गंधे नांवाचा कुणी तरुण, देखणा प्राध्यापक शिकवायला आहे असं ऐकते. तोच तर हा 'श्याम मनोहर' नव्हे ना? "

"मंदे, आता मात्र मारीन हं." कुसुम म्हणाली, पण तिच्या शब्दांना जोर उरलेला नाहीं हें तिचें तिलाच जाणवलें. आपलें व मनोहरचे प्रेम षट्कर्णी होत असल्याचा संशय तिला येत होता व तो किती यथार्थ होता याचा पुरावा तिला हा असा घरबसल्या मिळत होता.

"म्हणजे मी जें कांहीं ऐकलं ते खरं आहे म्हणायचं ?" कुसुमचा हात हातांत घेत मंदा म्हणाली, "आमच्या घरांत



घडत असलेली गोष्ट आम्हांला अशी लोकांकडून ऐकावयास मिळावी ना!"

"मंदे, थट्टा पुरे कर आता आणि खरं सांग, मी एवढी भाग्यवान असेन असं वाटतं तुला ?" एकदम् गंभीर होत कुसुम म्हणाली.

"तुझं कसचं भाग्य, त्याचंच भाग्य म्हण. एवढी गोरी, देखणी, गोड गळ्याची मुलगी त्याला जन्माची सोबती लाभायची आहे म्हटलं!" मंदा म्हणाली.

तिला जें कांहीं कळले होतें तें असें खरें निघाल्याचे पाहून तिला खरोखर खूप आनंद झाला होता. मनोहर गंधेबद्दल तिनें खूपसे ऐकलें होतें. त्याचे ललितलेख तिनें अनेकवेळां वाचले होते व त्याच्या असामान्य बुद्धिमत्तेबद्दल तिला अचंबा पण वाटला होता. तिला कुसुमच्या देखणेपणाचा व गोड आवाजाचा नेहमींच अभिमान वाटायचा, त्यामुळें आपल्या बहिणीला असा सुयोग्य वर लाभलेला पाहून तिला मनापासून आनंद झाला होता.

कुसुमसुद्धा मंदाच्या बोलण्यानें सुखावली होती. तिला विश्वासांत घेऊन ती म्हणाली, "अग, आज मोठी गंमतच झाली! आमच्या मराठी विभागाच्या मंडळाची मी आहे चिटणीस अन् मनोहरच्या हस्तें आमच्या मंडळाचं उद्घाटन करण्याचा घाट मंडळाच्या सभासदांनीं घातला होता. आतां ते अध्यक्ष तेव्हां त्यांचं स्वागत करायचं काम माझ्याकडेच आलं. बरं त्यांनीं तरी हार नुसता स्वीकारावा कीं नाहीं, तर ते नाहीं. उलट चांगला गळ्यांत हार घालून घेतला माझ्या हातून. चारचौघांच्या समोर. विद्यार्थ्यांनीं इतक्या टाळ्या दिल्या व एकजण तर चक्क 'शुभमंगल सावधान' म्हणून जोरानें ओरडला मला तर बाई तेथून पळून जावंसं वाटलं."

"वा, म्हणजे आज वाङ्‌निश्चय सुद्धां झाला म्हणायचा," मंदा म्हणाली व कुसुम अंगावर धांवून येत आहे हें पाहून हंसत-हंसत जिना उतरून निघून गेली.

मंदा निघून जातांच कुसुमनें पलंगावर अंग झोकून दिलें, तशी इतका वेळ थुईथुई नाचणारें तिच्या आनंदाचे पांखरू हळुहळू आपले पंख मिटून घेऊं लागलें.

☆ ☆ ☆

"सूर्याला ग्रहण लागलं, सूर्याला ग्रहण लागलं," बाहेरच्या अंगणांत शेजारचे शशि आणि नंदा रंगीत कांचेतून सूर्याकडे पहात टाळ्या पिटीत नाचत होते.

कुसुम आंतल्या खोलींत अभ्यास करीत बसली होती. तिची तंद्री भंगली. त्या तालबद्ध ओरडण्यानें तिला वाचन करणें कठिण झालें; पण परीक्षा अगदीं जवळ येऊन ठेपली होती व अभ्यास करणें तिला भाग होते. मनोहरांची विद्यार्थिनी म्हणून तिला चांगल्या तऱ्हेनें उत्तीर्ण तर व्हायचें होतेंच शिवाय त्यांच्या प्रेमाचें विवाहांत रुपांतर तिच्या एम्. ए. झाल्यानंतरच व्हायचें होतें.





अनुक्रमणिका

तिच्या वडिलांनीं याच अटीवर त्यांच्या विवाहास अनुमति दिली होती.

तिनें आपली नजर समोरच्या ओळींवर खिळविण्याची पराकाष्ठा केली पण मुलांच्या ओरडण्यापुढें मन एकाग्र करणं तिला अशक्य झालं. तेव्हां तिनें पुस्तक बाजूस ठेवलें व डोळे मिटून ती बराच वेळ स्वस्थ पडून राहिली. रोजच्या जागरणामुळें व सतत वाचनामुळें तिचे डोळे आतांशा मधुनमधुन दुखत. जडावत. डोळे मिटले कीं, डोळ्यांसमोर गोलगोल वर्तुळं फिरायला लागत. आतांसुद्धां तिला तसंच झालं. तेव्हां ती उठली व घरांतून दाराशीं आली.

तिला दाराशीं उभीं पाहून शशी आणि नंदा आपल्या कांचा घेऊन तिच्याकडे धांवतच आले आणि "ए कुसुम-आत्या, तुला ग्रहण पाह्यचंय् ?" असें म्हणत त्यांनीं आपल्या कांचा तिला देऊं केल्या.

त्यांच्या धांदलीकडे पाहून कुसुमला हंसू आलं. नंदाच्या हातांतील कांच घेऊन तिनें सूर्याकडे बघितले. त्या रंगीत कांचेतून सूर्य किती सौम्य वाटत होता. त्याची सारी उष्णता, प्रखरता त्या कांचेनें गिळून टाकली होती व चंद्रासारखा वाटणारा सूर्य गोलगोल फिरतांना दिसत होता. त्याचा अर्धा भाग पूर्ण काळा पडला होता. अभ्यासामुळें श्रमलेल्या, आक्रसलेल्या तिच्या डोळ्यांना सूर्याच्या ह्या सौम्य रुपाकडेसुद्धां फार वेळ बघवेना. तिनें सूर्यावरील आपली नजर काढून घेतली. मुलांना कांच परत केली व ती घरांत आली.

उजेडाकडे बराच वेळ पाहिल्यानंतर घरांत आल्यावर तिला अंधेरल्यासारखें झालं. त्या अंधारांतून उजेडाची गोल गोल वलयें उमटत होती. तिनें आपले डोळे चोळले. डोळे ताणून उघडले व पुन्हा मिटले. पुन्हा उघडले, पण उजेडाची वर्तुळं फिरतच होती. अंधार अधिक घन होत होता. जड होत होता. बुबुळांवर सांचत होता. ढवळून निघाल्यावर स्थिर होणाऱ्या चिखलासारखा. पुटावर पुटं चढलेला.



# यावे नाचत गौरीबाळा

**यावे नाचत गौरीबाळा**
**हाती घेऊनि पुष्पांच्या माळा**
**सर्वं ठायी मी वंदितो तुला**
**यावे नाचत गौरीबाळा**

**चौदा कलांचा तू मातापिता**
**सर्वं ठायी हाये तुजी सत्ता**
**चार वेदा घ्यावे वेळोवेळा**
**यावे नाचत गौरीबाळा**

**साही शास्त्रें अठरा पुराणं**
**तुजपासुनि झाली निर्माण**
**भक्त देव येती मंडपाला**
**यावे नाचत गौरीबाळा**

**मूळारंभी सत्त्व धरी पाया**
**संगे घेत सरस्वती माया**
**किती विनवी तुला भक्तमेळा**
**यावे नाचत गौरीबाळा**

**यावे नाचत गौरीबाळा**
**हाती घेऊनि पुष्पांच्या माळा**

संग्राहिका—**डॉ. सरोजिनी बाबर**

कुसुम तशीच, चांचपडत स्वयंपाकघरांत कोपऱ्यांत असलेल्या मोरीजवळ गेली. तपेलीसाठीं हातानें चांचपडत असतांनाच धक्का लागून तपेली मोरीत पडली. तिचा आवाज भयानकपणें निनादला. घुमत राहिला व घुमत घुमतच स्थिर झाला. त्रासिकपणानें तिनें बादलीच्या कडावरून बादलींत हात घातला. हात पाण्यांत बुडतांच तिनें आपलें तोंड थोडे खालीं वाकविलें आणि त्या गार पाण्याचा शिड... ...चेहऱ्यावर केला. ओंजळींत ... आपल्या ... घेऊन तिनें आपले डोळे पुसले, पण डो... जमलेला अंधाराचा चिखल कांहीं केल्या पुसला जाईना.



हें काय झालंय्, हें काय होतंय् हे तिला कळेना. पायाखालची जमीन पुसट पुसट दिसत होती. पण समोर मात्र अंधारच होता. खग्रास सूर्यग्रहणासारखा अंधार. पण सूर्यग्रहण कांहीं खग्रास नव्हतं. दारांतून पलिकडे अंधारावर उजाळा देणारा उजेड होता. त्या उजेडाची होणारी जाणीव होती. फक्त जाणीव. त्यापलिकडे कांहीं नाहीं. दारांतून पलिकडे दिसणारा फिकट काळा अंधार, खोलींतील दाट अंधार आणि पायाखालची अस्पष्ट दिसणारी जमीन. एवढ्यापुरतेंच तिचें विश्व सीमित झालें होतें.

धडपडतच ती दाराचा आधार घेऊन पुढे झाली आणि मंदाला जोरजोरांत हांका मारूं लागली.

मंदा तिच्याजवळ येऊन उभी राहिली तरी तिचें हांका मारणें सुरूच होते

"ए तायम्, हांका काय मारत बसलीस ? ही काय मी अगदीं तुझ्यासमोर उभी आहे," मंदा हंसत म्हणाली.

"कोण ? मंदा ! कुठं आहेस तूं ?" कुसुमनें विचारले. ती गोंधळल्यासारखी झाली होती

"आतां मात्र कमाल झाली बाई तुझी," तिचा हात हातांत घेत मंदा म्हणाली, "पण त्यांत तुझी तरी काय चूक आहे म्हणा. ज्या डोळ्यांना फक्त मनोहरांचेच दर्शन घेण्याची आवड आहे त्यांना इतर क्षुद्र मानव कसें बरं दिसणार ?"

"मंदे, थट्टा नको करूं. बाबांना बोलाव बरं. खरंच मला कांहींच दिसत नाहीं ग," कुसुम कांपऱ्या स्वरांत म्हणाली.

मंदा चरकलीच. क्षणभर काय करावं, काय बोलावं ते तिला सुचेना. कुसुमनें जें कांहीं सांगितले त्यावर तिचा विश्वासच बसत नव्हता.









तो क्षणसुद्धां कुसुमला असह्य झाला. ती ज्या जवळ तिच्या अंगावर ओरडली— "अग, गेली कीं नाहींस?"

"जाते," म्हणत तेथून निघून गेली. कुसुमनें तिच्याकडे डोळे फाडून पाहण्याचा यत्न केला, पण अंऽहं. प्रकाश किरणं नेहमींसारखीच येत होती. नेत्रावरणांतून नेत्रमण्यांतून वक्रीभूत होऊन मज्जापटलावर ओसंडत होती. पण पुढच्या क्रिया मात्र बरोबर होत नव्हत्या. बाह्य वातावरण आणि नेत्रमणी यांच्यांत उभी झालेली अपारदर्शक धूसरतेची भिंत कांहीं केल्या ढांसळत नव्हती कुठेंहि मान वळवली, पापण्यांची कितीहि फडफड केली, डोळे कितीहि ताणले तरी नवीन कांहींच दिसत नव्हते. जीवनाचा स्पर्श डोळयांना होत नव्हता. हंसरे जीवन डोळयांना शिवत नव्हते. त्यांतून येणारा विश्वाच्या चलनवलनाचा, मानवी भाव-भावनांचा, सुखदुःखाचा, सौंदर्यासौंदर्याचा प्रत्यय येत नव्हता. फक्त त्याची जाणीव तेवढी शिल्लक उरली होती व ती तिला गुदमरून टाकीत होती.

परीक्षा पंधरा दिवसांवर येऊन ठेपली होती. नव्या जीवनांत पहिलें पाऊल टाकण्याचा क्षणसुद्धां फार दूर नव्हता आणि तिचें सारें श्रम, साऱ्या आशा-आकांक्षा क्षणांत अंधाराच्या न संपणाऱ्या अथांगतेंत विलीन झाल्या होत्या.

तिच्या अन्तःकरणांत वेदनांचे उमाळे उमलत होते पण आंसूं मात्र फुटत नव्हते. ते फुटायला हवे होते. आंतल्या आंत घुसमटणाऱ्या दुःखाला कोठून तरी वाट मिळावयास हवी होती. आंसवांच्या रुपानें, कुणाच्या तरी उबदार कुशींत मस्तक विसावून.

तिला मनोहरची आठवण झाली. यावेळीं तो यायला हवा. तो आला कीं, त्याच्या खांद्यावर मान टाकून ती आपलं मन मोकळं करणार होती. तिचं मन त्याच्या भेटीसाठीं आक्रंदू लागलं.

तेवढ्यांत दार करकरलं—

मनोहर !

अभावितपणें तिच्या तोंडातून अस्पष्ट हांक निघाली.

"काय झालं ग बब्बड," तिच्या बाबांचा आवाज तिनें ओळखला.

"तिला एकदम बळ आल्यासारखं झालं. त्या आवाजाच्या रोखानें ती पुढें झाली व त्यांच्या देहाचा स्पर्श होतांच त्यांच्या छातीवर मस्तक विसावून हमसून हमसून रडूं लागली.

तिच्या केसांवरून हात फिरवीत बाबा म्हणाले, "ए बबड्या, रडायला काय झालं?"

"बाबा, मला दिसत नाहीं हो. मी आंधळी तर नाहीं ना झाल्ये?" व्यथा लेऊन शब्द निघाले आणि त्या मागोमाग आंसवं. डोळयांनीं दिसत नव्हतं आणि डोळयांतून आंसवं वहात होती ! नजर मेली होती तरी व्यथा जीवंत होती व आंसवांवाटे ती निथळत होती. शब्दांवाटे तिचा निचरा होत होता. घडलेलं सारं कांहीं तिनं बाबांना सांगितलं.

"कुसुम, असा धीर सोडून कसं चालेल ? आपण डॉक्टरला डोळे दाखवून पाहूं. कांहींतरी उपाय निश्चित सांपडेल." बाबा म्हणाले. त्यांचा चेहरा गंभीर झाला होता. मंदाकडे वळून ते म्हणाले, "तूं ड्रायव्हरला गाडी तयार ठेवायला सांग बरं. आपण आतांच जाऊं."

मंदा जड पावलांनीं तेथून निघून गेली. बाबांनीं कुसुमचा हात धरून तिला दिवाणखान्यांत आणली. तिला कोचावर बसवून ते म्हणाले, "तूं बस हं, हा मी आलोच कपडे करून."

दूरवर जाणाऱ्या पावलांच्या आवाजांनीं तिला जाणवलं कीं, पुन्हां आपण एकटेंच आहोंत. फक्त अंधार—काळामिट्ट अंधार तेवढा आपला साथी आहे, दुसरं कुणी नाहीं !

★ ★ ★

"कुसुम", दारांतून हांक आली.

त्या हांकेनें ती मोहरली. ज्या आवाजासाठीं कान चातक झालें होते, तो आवाज कानीं येतांच तिच्या भावना सैरभैर झाल्या. घाईघाईनें अंथरुणावर उठून बसत स्पर्शानें त्याचा देह जाणवण्यासाठीं ती आतुर झाली. कारण स्पर्शाची जाणीवच आतां दृष्टीचें काम करणार होती.







तिची ती अवस्था पाहून क्षणभर मनोहर गलबलून गेला. एका दिवसांत ती किती खचली होती. खंगली होती. तिच्या चेहऱ्यावर सदोदित टवटवीत दिसणारें चैतन्याचें फूल कोमजलें होते व त्याजागीं उमललेली व्यथेची हिडीस दिसणारी असंख्य फुलं मनाला उबग आणीत होती. तिचे विकल डोळे पट्टीच्या आवरणाखालीं झांकले गेल्यामुळें त्यांची भयानकता मनाला तेवढी जाणवत नव्हती, नाहींतर तिच्या सन्निध जाण्याचें धैर्य-सुद्धां त्याला झाले नसतें.

पुढें होऊन त्यानें तिचें त्याला शोधीत असलेले हात हातांत घेतले व तो तिच्या शेजारी पलंगावर बसला.

त्याचे दोन्हीं हात घट्ट धरून ठेवीत त्यावर मस्तक टेकवीत कुसुम म्हणाली, "मना, आतां मी काय करूं ? तुला कसं पाहूं," आणि ती रडूं लागली. तिच्या डोळयांतून ओघळणारी आंसवं तिनें डोळयावर बांधलेल्या पट्टीवरच टिपली जात होती व हुंदकेच तेवढे वाहेर निसटत होते. मनोहरचा स्पर्श होतांच तिला सांवलीत आल्या-सारखं वाटलं. स्पर्शानेंच तिनें त्याच्या चेहऱ्याचा आकार टिपून घेतला. ती आठवण तिला असह्य झाली आणि तिनें त्याच्या बोटांत गुंतलेली आपली बोटें सोडवून घेतली.

"कुसुम, असं वेड्यासारखं नाहीं करायचं. सारं कांहीं ठीक होईल," पुढें होऊन तिच्या केसावरून हात फिरवीत, समजावणीच्या स्वरांत मनोहर म्हणाला, "मंदानं मला सारं कांहीं सांगितलं. माझा त्यावर विश्वासच बसत नाहीं. ग्रहण पाहून कां कुणाचे डोळे अधू झाले आहेत ? मला तर ही तात्पुरती अवस्था वाटते."

"डॉक्टरसुद्धां हेंच म्हणत होते. पण मला विश्वास नाहीं वाटत. माझं सान्त्वन करण्यासाठीं सगळे खोटं बोलत आहेत असंच वाटतं मला," आपल्या दुःखाला आंवर घालीत कुसुम म्हणाली, "आतां माझ्या परीक्षेचं काय होईल आणि आपल्या—", पुढचे शब्द उच्चारण्या-पूर्वीं कुसुम थांबली. तिच्या जीवाची विलक्षण घालमेल होत होती. तिचें पंगुत्व या क्षणाला तिचें तिलाच विशेष जाणवायला लागलें होतें. ती अगदीं एकाकी बनली होती. आदि नाहीं, अंत नाहीं. आसऱ्याला भिंती नाहींत अशा पोकळींत ती उभी होती. त्या पोकळींत फक्त मनोहरचा आवाज घुमत होता. त्या अनुरोधानें ती पुढें पुढें चालली होती. तो आतां आवाक्यांत आला आहे एवढेंच तिला जाणवलें. तेवढेंच तिला हवें होतें. तिला आसरा हवा होता. जिवाच्या आकान्तानें ती म्हणाली, "मना, अजूनहि तूं माझ्याशी लग्न करशील ? एका आंधळीचा जन्माचा सोबती होशील ?"

जो प्रश्न तिनें विचारूं नये, पण जो ती नक्की विचारील असं त्याला वाटत होतं, तो प्रश्न प्रत्यक्षांत विचारला जातांच त्याला कांहीं सुचेनासं झालं. तो तिला उत्तर तरी काय देणार होता ? त्यानें या प्रश्नाचा नीट विचार केला नव्हता. कारण अगदीं अकस्मातच तो प्रश्न त्यांच्यापुढें उभा ठाकला होता.

तिच्या ओठावर हात ठेवीत तो म्हणाला, "असं नाहीं बोलायचं. तूं असं कांहीं बोलायला लागलीस कीं, अन्तः-करणांत कसं कालवल्यासारखं होतं. तूं स्वतःला आंधळी कां समजतेस कुसुम. तूं नक्की बरी होशील ?"

किती फसवे शब्द तो उच्चारीत होता. कुसुम बरी होणार होती कीं, जन्माची आंधळी राहणार होती हें त्याला-सुद्धां ठाऊक नव्हते. पण "तूं जशी अस-शील तसा मी तुझा स्वीकार करायला तयार आहे," असें निःसंदिग्धपणें त्याच्यानें तिला सांगवलें नाहीं, हा त्यांच्या प्रेमाचा पराभव होता.

आयुष्यांत प्रथमच त्याचा असा पराभव झाला होता. आतांपर्यंत त्याला हवं होतं त्याहून अधिकच त्याला मिळत गेलं होतं, त्यामुळें न्यून अथवा वैगुण्य असलेली कोणतीहि गोष्ट स्[illegible]ारण्यास तो कधीं तयार नसायचा. [illegible] प्रत्येक गोष्ट मग तो कपडा असो, परीक्षे[illegible] यश असो अथवा नोकरी असो, त्याची निवड चोखंदळ असायची. आपल्या भावी पत्नीची निवडसुद्धां त्यानें तितक्याच चोखंदळपणें केली होती. कुसुमसारखी सर्व बाबतींत परिपूर्ण असलेली स्त्री प्रेयसी म्हणून लाभल्यापासून तो स्वतःला धन्य समजायला लागला होता. पण घडलेल्या घटनेमुळें त्या धन्यतेला तडा गेला होता.

या नव्यानें निर्माण झालेल्या परि-स्थितीचा सामना कसा करावा हे त्याला कळेनासें झालें. एका आंधळीबरोबर जन्मभर संसार करायचा ? तिला आयुष्य-भर जपायचं ? एक वेगळेंच चित्र त्याच्या नजरेसमोर उभें राहिले.

रस्त्यानें तो चालला आहे. त्याचा हात धरून ती चालली आहे. आपले अंधत्व लपविण्यासाठीं कुसुमनें काळा चष्मा लावला आहे व डोळस माणसा-सारखे चालण्याची ती धडपड करीत आहे, त्यामुळें ती दृष्टिहीन आहे हें अधिकच जाणवतं आहे. लोकांच्या नजरा सहानुभूतीनें त्या दोघांकडे पहात आहेत. आंधळी पत्नी लाभली म्हणून सहानु-भूति. ती कल्पनाच त्याला रुचली नाहीं. आत्यंतिक प्रेम मनांत असतांनाहि तो वैगुण्य असलेल्या कुसुमचा स्वीकार कल्पनेंतसुद्धां करायला तयार नव्हता.

कल्पनेंतच चितारलेल्या त्या चित्राचे त्यानें तुकडे तुकडे केले व कुसुमच्या आशा आकांक्षांचे ते कपटे वाऱ्यावर सोडून देऊन तो त्याकडे निर्विकारपणें पहात बसला. त्याचं मन नकळतच कुसुमच्या अन्तः-करणाशी जोडले गेलेले पाश तोडूं लागलं.

पुढील उपचारासाठीं ती मुंबईला गेल्याचं कळतांच, त्याला स्वतःची सुटका झाल्यासारखें वाटलें.

★ ★ ★

कुसुमच्या अचानक आलेल्या अंधत्वा-मुळें सारे डॉक्टर बुचकळयांत पडले होते.

( पृष्ठ ५८ वर पहा )








‘माझ्या कांतिसौंदर्याचं श्रेय लक्सलाच!’
—शर्मिला टागोर

आपलीहि कांति शर्मिला टागोर हिच्या कांतीइतकीच महत्त्वाची...आपल्याहि कांतीची निगा तशीच राखायला हवी!

सौंदर्यवती शर्मिला म्हणते, ‘सतेज, निर्व्यंग कांति ही स्त्रीला मोठी अभिमानाची गोष्ट वाटत असते. म्हणूनच मी म्हणतें, आपल्यालाहि आपुल्या कांतीबद्दलं माझ्या इतकंच महत्त्व वाटत असणार. आपणहि माझ्याचप्रमाणं लक्स वापरा. माझ्या रोजंच्या सौंदर्यनिगेंत त्याला महत्त्वाचं स्थान आहे. लक्सचा मृदुमृदुल फेस किती सौम्य... आणि किती मधुर सुवासिक! आपल्याहि सौंदर्यसाधनेसाठीं लक्सचाच उपयोग करा!




शुभ्र व इंद्रधनुष्याच्या चार रंगांत

**लक्स टॉयलेट साबण** सिनेतारकांचा शुद्ध सौम्य सौंदर्यसाबण

लिंटास—LTS. 191-140 MA

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन



अनुक्रमणिका








सृष्टीचा निर्माता परमेश्वर (वा ब्रह्मदेव म्हणा) मोठा लहरी, विनोदी प्राणी असला पाहिजे. त्याच्या स्वभावाचें पृथःकरण करणें कठिण. कधीं कधीं जन्मही पुरत नाहीं असेंही दिसते. कधीं त्याच्या कृपणपणाबद्दल वैताग व्यक्त करून खिन्न मनानें वावरूं लागावें तोंच समोर त्याच्या उदारतेची सुंदर मूस येऊन उभी रहावी आणि सारी खिन्नता नाहींशी व्हावी. कधीं कांहीं खूप चांगले दिलेले तर कांहीं तितकेंच मौलिक काढूनही घेतलेलें. एखादी कोमलांगी पुढें यावी आणि तिनें "काय हो ! " म्हणून पुरुषी पुकारा करावा म्हणजे जो कांहीं अपेक्षाभंग (व त्यांतून विनोदही) होतो तो आपण कधीं कधीं अनुभवतोच ! पण कधीं "खुदा छप्पर फाडके देता है" असें आढळतें आणि मन प्रसन्न होते. ती तृप्ति पुष्कळ दिवस पुरते.

हें मी प्रा. वसंत कानेटकरांच्या संदर्भांत कां बरें लिहितो आहे ? कानेटकरांच्या लेखनासंबंधीं लिहितांना हें 'कवित्व' केलेंच पाहिजे कां ? कानेटकरांच्या व्यक्तित्वाचा परिचय करून देतांना त्यांच्या नाटकांतल्याप्रमाणें कांहीं 'वैचारिक' पातळीवरचे आलेंच पाहिजे काय ? प्रश्न मीच विचारतो आहे आणि उत्तरेंही अर्थांत मीच देणार आहे. कानेटकर यांच्या कथा, कादंबऱ्या मी वाचल्या होत्या (त्यावेळी ते नाटककार नव्हते) आणि असाच सहज म्हणून नाशकाला गेलो होतो. त्यावेळीं एका सार्वजनिक कार्यक्रमाचे वेळीं मी कानेटकरांना प्रथम पाहिलें. त्यांचें व्याख्यान ऐकलें. त्या दिवशीं माझ्या मनांत झटकन् एक विचार येऊन गेला. "A grand Personality" असा तो विचार होता. 'पर्सनॅलिटी' म्हणजे मला केवळ देखणेपण सुचवायचें नाहीं. तसे कानेटकर देखणे आहेतच. ते नाटकांत कामें करीत होते. चांगला नट होण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. ह्या मागें ह्या देखणेपणाचा पाठिंबा होता हें गृहित धरलेंच पाहिजे. त्या 'पर्सनॅलिटी'त मी अनेक गोष्टी गृहित धरतो. कानेटकरांच्या 'पर्सनॅलिटी'त त्यांचें कवित्व आले, नाटयकर्तृत्व आले, वक्तृत्व आलें, असामान्य स्मरणशक्ति आली, सुंदर, दाणेदार अक्षर आलें, जिद्द आली, महत्त्वाकांक्षा आली, कलावंताला नेहमींच आवश्यक असलेला ताजेपणा आला. त्यासाठीं आवश्यक असलेलें स्वप्नरंजन आलें व स्वप्नें पाहणारी, त्यांत रमणारी, नाटय Visualise करूं शकणारी, वस्तुवस्तूंतलें सौंदर्य पाहूं शकणारी सौंदर्यदृष्टी आली, प्रयोगक्षमता आली आणि विचारधन आले. त्या सर्वांत व सर्वांहून मोठा असा आशावाद आला. गोष्टी वेल्हाळपणा आला, हंसरेपणा आला. गुण हेरणारी, जाणणारी व दाद देणारी रसिकताही आली. जीवनावर अपार प्रेम करणारा आणि जीवनांतल्या सुंदरतेवर श्रद्धा बाळगणारा माणूसच 'मत्स्यगंधे'तला 'भीष्म' लिहूं शकतो. त्यालाच 'शिवाजी'च्या उरींचे "संभाजी"बाबतचेच केवळ नव्हे तर "स्वराज्या"बाबतचें शल्य बोंचते. त्यालाच 'जिजाई'च्या व्यक्तित्वांतलें 'नाटय' दिसतें. मोठया नाटकांना मोठें मन लागते, मोठे संस्कार लागतात, मोठी झेंप लागते. त्याला क्षणिकामागचें 'सनातन' दिसावें लागते. कानेटकरांच्या सहवासांत हें जाणवतें. कानेटकर भारावून गेलेले असले तरी त्यांचे पाय जमिनीवर आहेत. काव्य लिहिणारा आणि जगणारा असा हा नाटककार आहे. कॉलेजांतली प्राध्यापकी करतांना तेथलें काव्य ते हेरतात. 'नाटय' त्यांच्याकडे चालत येते. मग जन्म होतो एखाद्या 'प्रेमा तुझा रंग कसा'सारख्या नाटकाचा ! "यशासारखें

# “लौकिक अपयशांची ‘रिस्क’ घेऊनही कांहीं निर्मिती होत राहते, तेव्हांच कलेची प्रगति होते, असें मला वाटतें”

## –प्रा. वसंत कानेटकर

**यशस्वी कांहीं नाहीं” असें म्हणतात. कानेटकर आजचे यशस्वी नाटककार आहेत. लौकिक यशापयश आणि चांगली कला यांची रास नेहमीं जमतेच असें नाहीं. चांगली कला देण्याची ताकद मग महत्वाची मानली जाते. कानेटकरांच्या कलेनें हा विश्वास मराठीला दिला आहे. कलावंताला कठोर आत्मपरिक्षक होतां आलें पाहिजे. कानेटकर हे असे आत्म-परीक्षण करतात आणि आपल्या कादंबऱ्यांची नवी आवृत्ती काढतांना ‘त्या पुन्हां लिहिल्या पाहिजेत’ असें त्यांच्या मनांत येऊन जातें. घरां-तले वातावरण प्रसन्न, साहित्यासंबंधीं आस्था असलेलें. मुलें ‘वारसा’ चालविण्याची ‘जर्मस्’ घेऊन आलेली! नाटकांत ‘इंटरेस्ट’ असलेली! कानेटकरांच्या नाट्यनिर्मितीच्या काळांत हीं सारीं पात्रें त्या त्या भूमिका जगत असतात. घराच्या भिंती गडाच्या भिंती होतात. मांणसें ‘सामाजिक’ असुन ‘ऐतिहासिक’ बोलूं लागतात. सर्वार्थानें तें घर नाटक जगूं लागते. आणि म्हणूनच हा ‘हाडाचा’ नाटककार ‘सजीव’ नाटकें लिहूं शकतो आहे. नाटककार कानेटकर आपली ‘भूमिका’ चोखपणें बजावीत आहेत. त्यांची ही ‘भूमिका’ पहायला आपल्यालाही आवडेल, नाहीं? चला तर !!**

☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆

**प्रश्न:**–आपल्या लेखनाला सुरुवात कशी काय झाली?

**कानेटकर:**– जन्मापासूनच भोंवतीं वाङमयीन वातावरण होतें. वाङमयाची आवड त्यांतूनच पोसली गेली. रविकिरण मंडळांतील सारे कवि घरीं येत. काव्यवाचन, काव्य-विषयक चर्चा चाले. त्यामुळें वाङमयीन अभिरुची विकसित होत गेली. माझ्या वाङमयीन अभि-रुचीच्या विकासाला भाऊसाहेब खांडेकरांचा सह-वास फार मोठ्या प्रमाणांत कारणीभूत झाला आहे. मी कॉलेजमध्यें असतांना त्यांच्या लेखनानें आणि व्यक्तित्वानें मी फार दिपून गेलो होतो. महाविद्या-लयीन जीवनांत खांडेकर आणि व्यवसायानिमित्त नाशिकला आल्यानंतर कुसुमाग्रज ह्या दोघांचा सहवास मला फार उपयुक्त ठरला. कळत न कळत मी लिहूं लागलो.

**प्र.** आपली पहिली कथा वा लेख कधीं प्रसिद्ध झाला?

**का.** माझी पहिली नांव घेण्यासारखी बरी गोष्ट मी इंटरच्या वर्गांत शिकत असतांना प्रसिद्ध झाली. १९४० सालीं ती गोष्ट **‘जन्माचे गुलाम’** ह्या शीर्षकानें ‘मनोहर’मध्यें प्रसिद्ध झाली.

**प्र.** आपल्या त्या पहिल्यावहिल्या लेखनाबद्दल आज आपल्याला काय वाटतें?

**का.** सुमारें १९५० सालपर्यंत मी कथालेखन केलें. कारण मला कथा-कादंबरीकार व्हायचे होतें. किर्लोस्कर, सत्यकथा आदि प्रमुख मासिकांतून मी पुष्कळ कथा लिहिल्या. १०० च्या वर मी कथा लिहिल्या आहेत. परंतु अजून कथासंग्रह असा माझ्या नांवावर नाहीं. कांहींतरी वैशिष्ट्यपूर्ण केलें तरच संग्रह यावा असें मला वाटतें. प्रारंभीचें लेखन ‘अॅमेच्युरिश’ आहे. अनुकरणात्मक आहे. तें स्वतंत्र वाटत नाहीं. माझी त्याबद्दलची भावना अशी आहे.

**प्र.** बऱ्याचशा गद्य लेखकांच्या लेखनाची सुरुवात काव्य निर्मितीनें झालेली आढळून येते. आपण तर आजही अधुनमधुन काव्याचें माध्यम वापरतांना दिसतां. आपल्या लेखनाची सुरुवात कवितेनेंच झाली काय?

**का.** माझ्या लेखनाची सुरुवातही काव्य लेखनानेंच झाली आहे. रेडिओसाठीं कांहीं संगीतिकाही मी लिहिल्या होत्या. काव्याची मला खूप आवड आहे. तुकाराम, केशवसुत, अनिल हे माझे आवडते कवि. पण काव्यलेखन हें मला केवळ कष्टसाध्य आहे. काव्य व नाटक हे दोन विषय मला शिकवायला फार आवडतात.

**प्र.** आपल्या लेखनाच्या प्रारंभकाळीं आपलीं दैवतें कोणतीं होतीं? आज त्यांच्याबद्दल तीच भावना कायम आहे काय?

**का.** दैवतें हा शब्द जरा बरोबर वाटत नाहीं. दैवतें बालपणांत असतात. प्रेरकस्थळें जन्मभर मिळत राहतात. माझ्या लेख-नाच्या प्रारंभकाळीं भाऊसाहेब खांडेकर यांच्या व्यक्तित्वाचा व वाङमयाचा पगडा माझ्या मनावर खूप होता. अजूनहि खांडेकर ही ‘व्यक्ति’ त्यांच्या वाङमयापेक्षांहि फार मोठी आहे असें मला वाटतें. वाङमयाच्या क्षेत्रांत परिश्रम, वाचन आणि चिंतन याचा नवोदितापुढें ते एक आदर्श उभा करतात

**मुलाखत--प्रभाकर अत्रे**










अनुक्रमणिका

आणि आपुलकीनें आणि चोखंदळपणें अभिरुचि घडवतात. आजच्या वैफल्याच्या युगांत माझी जीवनावरील श्रद्धा टिकून आहे याचे कारण वऱ्हेंशी खांडेकरांनीं केलेलें संस्कार हेंच आहे. त्यांच्या सहवासांतच माझें चिकित्सक मन विकसित होत गेलें. त्यांच्या बुद्धीची तरलता आणि त्यांची तळमळ मला मोहिनी घालते. म्हणूनच त्यांच्या प्रस्तावना मला फार आवडतात. त्यांचें पृथ:करण अतिशय प्रभावी असते. त्या अतिशय well worded अशा असतात. अलिकडच्या काळांत कुसुमाग्रज यांच्या सहवासांत मला खूपच गोष्टी शिकायला मिळाल्या. कलावंताचा जो ताजेपणा आहे तो सतत टिकला पाहिजे. त्यासाठीं त्यानें कोठलीहि झापड लावून घेतां कामा नये. कलानुभवाचे सुवर्णकण कोणत्याहि चौकटींत व साच्यांत बसत नाहींत अशी माझ्या मनाची धारणा झाली आहे. दैवतें म्हणूनच जर उल्लेख करायचा झाला तर तो लेखक म्हणून शरच्चंद्र, शेक्सपियर व कवि म्हणून केशवसुत आणि तुकाराम यांचा मी करीन.

**प्र.** एखादा विषय सुचला तर आपण कांहीं टांचणें, वा डायरींत नोंद वगैरे कांहीं ठेवतां किंवा काय ?

**का.** टांचणें अशी ठेवीत नाहीं. एखादा विषय सुचला कीं, त्याचें चिंतनच सुरू होते.

**प्र.** कांहीं कांहीं लेखकांची 'वेळापत्रकानुसार लिहिण्याची पद्धत असते. (Planned Writing) ची ! आपण असें लेखन करतां काय ?

**का.** वेळापत्रक मला मंजूर नाहीं. पहिला अंक लिहिल्यावर मला Break घ्यावा लागतो. मग मनाच्या कप्प्यांत विषय टाकून मी फिरत राहतों. पुष्कळदां सांगतां सांगतां गोष्ट पुढें जाते. ठरवून, विचार करून, असें पुढें जातां येत नाहीं. कधीं कधीं तर रात्रीं झोंप येत नसेल तर मी उठून लिहीत बसतो.

**प्र.** लिहितांना कांहीं विशिष्ट वातावरणाचा वगैरे आग्रह असतो काय ?

**का.** असतो बुवा ! माझ्या टेबलाजवळच मला लिहायला बसायला आवडते. टेबल कसे ? पूर्वीच्या काळीं जमिनीवर बसून समोर टेबल ठेवून लिहिण्याची भारतीय पद्धत होती ना ? माझी पद्धत तीच आहे. मला लिहितांना एकांत लागतो आणि सिगरेट लागते. मी जेव्हां Vacant असतो तेव्हां मला सिगरेट लागत नाहीं. पण डोकें चालू असले कीं, तोंडांतली सिगरेटही चालू असावी लागते.

**प्र.** लेखनाची धुंदी चढते कीं नाहीं ?

**का.** लेखनाची धुंदी तर खूपच चढते. त्या काळांत मला कुणीं त्रास दिलेला आवडत नाहीं. खूप ताप होतो.

**प्र.** निर्मितीनंतरच्या आपल्या भावस्थितीचं (Mood) कांहीं वर्णन करतां येईल काय ?

**का.** लिहीत असतांना मी त्या त्या भूमिका जगत असतो. त्या त्या माणसांशीं त्यांची त्यांची भाषा बोलत असतो. रायगडच्या वेळीं तर मी शिवाजी राजे, संभाजी राजे ह्यांच्याच घरांत वावरत आहे असे वाटत होते. जणुं तीं सारी माणसें आमच्या घरीं आलीं आहेत असेंच Feeling सारखे येत होते. रायगडचें लेखन पूर्ण झाल्यावर त्याची 'पाठवणी' झाली तेव्हां "आज आपल्या घरची पाहुणे मंडळी गेली" असें आम्हां सर्वांना वाटलें.

**प्र.** निर्मितीचा आनंद आपल्याला सर्वांत कोणत्या कलाकृतीनें अधिक दिला आहे ?

**का.** 'रायगडा'नें मला अधिक आनंद दिला. एक तर तो नवा प्रयत्न होता. एक नवें आव्हान होते. नवा प्रयोग होता.

**प्र.** प्रत्येक अनुभव आपापला Form बरोबर घेऊन येतो असें आपणांस वाटतें काय ? कीं, फॉर्म हा नंतर ठरतो वा बदलत जातो ?

**का.** फॉर्म घेऊनच प्रत्येक अनुभव आपल्याजवळ येत असतो असें मला वाटते. त्या त्या अनुभवाचा फॉर्म ठरला कीं, जें नवनवीन सुचते तेंही त्याच 'फॉर्म'मधून सुचते. लेखनाला कांहीं एक निश्चितता येते.

**प्र.** आपल्या **पंख** आणि **पोरका** ह्या कादंबऱ्यांत आपण नाटक, नाटकवेडा पांडू मास्तर व छब्या ह्या व्यक्तिरेखा रेखाटल्या आहेत. लेखक पुष्कळदां कळत नकळत आपल्या आवडीनिवडी पात्रांवर आरोपित करीत असतो (किंवा तें केलें जातें) कादंबरींतली तीं पात्रें रंगवितांना आपल्या बाबतींत नेमकें काय घडलें आहे ?

**का.** नाटकाची मला खूप आवड होती व आहेही. नाटकांत कामें करण्याची मला फार आवड. शाळा कॉलेजांत मी नाटकांतून कामें करीत असे. बाबूराव गोखले, भालबा केळकर व मी कॉलेजमध्यें एका नाटकांत कामें केलीं आहेत. पण नाशिकला प्रोफेसर म्हणून आलों आणि प्राध्यापकानें नाटकांत कामें करणें एकूण 'बरें नव्हे' असें माझ्या मनावर बिंबवण्यांत आले. पुढें मी आजीव सेवक झालो. त्यामुळें तर रंगभूमीवर येण्याची आवड गुंडाळूनच ठेवावी लागली. मन गुदमरूं लागलें. चांगला नट होण्याची माझी महत्वा-








कांक्षा होती. ती कळत नकळत आपल्या कलाकृतींत आविष्कृत झाली असावी. असें होतें–होत असावें असें मात्र मला वाटतें."

**प्र.** आपण **'घर'** ह्या कादंबरींत संज्ञाप्रवाहाच्या कल्पनेचा वापर केला आहे. त्यामुळें 'नवकादंबरीकार' असा शिक्का आपल्यावर मारला गेला आहे. त्या निर्मितीचा इतिहास सांगाल काय ?

**का.** जरूर ! मोठा गंमतीचा आहे तो ! अहो, नवकाव्य व नवसाहित्य याबद्दल मनांत एक प्रकारची उबग होती. तसा माझा पिंड जुन्या पठडींत पोसलेला. पण प्राप्त परिस्थितीसंबंधीं मात्र मनांत एक प्रकारचें असमाधान होते. त्या वेळचे माझे मित्र राजाभाऊ पाटणकर नवकाव्याचे चाहते होते. मर्ढेकरांची कविता त्यांनीं वाचून दाखविली. अशी कविता मीहि पाडून दाखवितो असें मी म्हणालो. आणि मी बसल्या बैठकींत एक कविता लिहिली.

**प.** ती कविता सांगाल काय?

**का.** अवश्य ! माझी तोंडपाठ आहे ती कविता अजून ! घ्या लिहून ! कवितेचें शीर्षक आहे **'साम्राज्यवादीस'**. खरे म्हणजे शीर्षकालाहि काहीं अर्थ नव्हता. सुचला तो शब्द दिला एवढेंच.

गारसलेली बुभुळें चोखित
भुतें प्रदक्षित भंवती पारा
अप्टुडेट जप गहिरें गर्जत
गिधाड झडपी मिणमिण तारा ।।
हुकुमशहाचा किलवर एक्का.
किती पारधी करितो फन्ना
पण भाळावर करडा बुक्का
रांडा पोरें महाग अन्ना ।।
सफेत कॉलर कडक विजारी
परी नागडे आंतुन ओंगळ
तोंडें विचकित खडे शिवारी
बांबू मडकें रंगित भोंगळ ।।
शाप उद्यांचे हिरवे हिरवे
गार्ड हालवी गडद धुक्यांतुन
डोळे मारित तिरवे तिरवे
वळणा वरती आले एंजिन ।।
पुकली गाडी हुकला तारा
भुतें सेविती स्मशान वारा
अप्टुडेट जप पादर फुसके
गिधाड देई आंचके उचके.

ही कविता मी १९४९ सालीं लिहिली. ह्या कवितेच्या मागें हेतु नवकवितेची टिंगल करण्याचा होता. ह्या कवितेचा अर्थ मलाही ठाऊक नव्हता. पण एका विद्वान गृहस्थांनीं त्या कवितेचा ठणठणीतपणें अर्थ लावून दाखवला. आणि मी चाट पडलो. त्या क्षणापासून माझ्या मनांत सतत जुन्या नव्याचा संघर्ष चालूं आहे. ह्या अंतर्द्वंद्वातून माझा सतत प्रवास चालूं आहे. ह्या संघर्षांतून मी अनुभव व्यक्त करूं लागलो. तो करीत असतांना मुक्तछंद, Stream of Consciousness चा भाग येत गेला. आणि नवकादंबरीकार म्हणून छाप बसला.

**प्र.** त्या कादंबरीसंबंधीं आपली आजची प्रतिक्रिया काय आहे ?

**का.** ती कथा, तंत्र व योग्य तो तोल सांभाळून पुन्हां लिहितां येईल असें आजही मला वाटतें. माझ्या पंख, पोरका ह्या कादंबऱ्यांची नवी आवृत्ती काढतांना मला वाटले होते कीं त्या पुन्हां लिहाव्यात. पण मग माझ्या मनांत विचार आला कीं, त्या वेळच्या कानेटकरवर न्याय अन्याय करायचा आजच्या कानेटकरला काय अधिकार आहे ? मला लेबल लावून घेतलेलें आवडत नाहीं. "घर"मध्यें Dramatic element आहे. **'पोरका'**त पुष्कळ प्रकरणांतून Complete dialogues आलेले आहेत. त्या आधीं मी Radio plays लिहिले होते. निरुपण वा Narration लाच मला त्रास पडतो.

**प्र.** आपल्या गद्य लेखनांत काव्याची फार Deep Impressions मला पहायला मिळालीं. काव्याच्या माध्यमाचें हें सहाय्य कलाकृतीला मारक ठरलें नाहीं. पण ही साधना आपण कशी केली ?

**का.** माझा नैसर्गिक ओढा कवितेकडे आहे. कवींकडे आहे. घरीं तर आमच्या कवींचा तळच होता. त्याचा परिणाम माझ्या लेखनावर कळत नकळत होत गेला असावा असें मला वाटतें.

**प्र.** आपण कथा, कादंबरी, काव्य, संगीतिका हीं माध्यमें प्रथम

हाताळली व कादंबरीकार व्हायचें अशी आपली इच्छा होती. पण आज आपण आघाडीवरचे एक नाटककार झालां आहांत. आपण एकदम नाटकाकडे कशी काय झेंप घेतली ?

**का.** नाटकें लिहिण्यापेक्षां नाटकांत कामें करणें, चांगला नट होणें ही माझी महत्वाकांक्षा होती हें मी मागें सांगितलेंच आहे. पण माझी कुचंबणा होऊं लागली. नाटकांत कामें करतां येईनात. किर्लोस्कर, सत्यकथेंतून गोष्टीं लिहीतच होतो. नाटक हा त्या मानानें कमी प्रतीचा फॉर्म असेंच मी मानीत होतो. नाटक हें गर्दीसाठीं असते. गर्दी आली कीं, मग पदों-पदीं तडजोड आली म्हणून मला त्या माध्यमावद्दल फारसें प्रेम नव्हते. मनांत द्वंद्व सुरू होई. मग शेक्सपियर, शॉ, वगैरेंबद्दल काय म्हणावें ? नाटककार नाटकाच्या काव्या-र्थाला फक्त जबाबदार! नटाला वा प्रेक्षकाला योग्य तो समज हवा–तो नसला तर मग कलाकृतीची एकेरी प्रतिमा उभी होते. Artist's vision हें त्याचं एकट्याचं रहात नाहीं. त्या त्या प्रमाणांत नाहीं म्हटलें तरी ती ती कलाकृति कांहीं प्रमाणांत Suffer होतेच असें मला वाटतें. सारखें मनांत द्वंद चाले. वेरूळ, अजिंठ्याला गेलो. तेथल्या त्या सुंदर सुंदर शिल्पाकृति पहात असतांना मनाला प्रश्न केला, "किती जण ही कलाकृति निर्मिण्यासाठीं खपत होते ? किती वर्षें खपत होते ? One mind, one vision म्हणून उत्तर मिळालें. अशा द्वंद्वात्मक मनस्थितींत असतांना मी एक कादंबरी लिहायला घेतली. सारखे संवादच चालू राहिले. एक दिवस मी बायकोला म्हणालो, "मी एक Novel -cum-Drama लिहितो आहे." ती म्हणाली "त्यापेक्षां सरळ नाटकच लिहा कीं." तें हस्तलिखित मी ठेवून दिलें आणि एक दिवस मला नाटकांतले तिन्हीं अंक Visualise झाले. मग दोन अंक मी



लिहिले. Expression साठीं अडून बसलों नाहीं. नाटक पूर्ण झालें– **वेड्याचं घर उन्हांत** ! आणखीही मला असं वाटतं कीं, ह्याचं श्रेय **प्रि. गोकाक** ह्यांच्या शिकवणुकीलाही आहे. त्यांनीं आम्हांला 'शेक्सपियर' असा अप्रतिम शिकविला कीं, मला वाटतें, रायगड, मत्स्यगंधा ह्यांचीं बीजें त्यांच्या शिक-वण्यांत आहेत. अजून त्यांचा आवाज माझ्या कानांत घुमतो.

**प्र.** नाटकांच्या कल्पना कशा काय सुचतात ?

**का.** कुणीतरी विद्यार्थी, नातेवाईक येऊन आपली कहाणी सांगून जातो. आतां **'प्रेमा तुझा रंग कसा'** ह्या नाटकाचीच गोष्ट सांगतो. माझा एक विद्यार्थी एक दिवस माझ्याकडे आला. त्याचा प्रेमविवाह झाला होता. पण प्रेमविवाह होऊनही सारखीं भांडणें होत. मग मुलें होतात. सारें कांहीं विसरलें जातें. तो हें सांगत असतांना, त्याच्याच कथेंतलें नाटच मला दिसूं लागलें आणि मी त्याला चटकन् म्हणालो, "आज तुम्हीं एका नाटकाचा विषय दिला" त्या नाटकांतल्या **"बाजा"**च्या प्रसंगाची गंमत सांगतो. पंडितजींची बहीण कृष्णा आणि राजा हाथीसिंग ह्यांच्या प्रेमाची जी कथा "ना खंत ना खेद" (with no regrets) मध्यें आली आहे ती अशीच आहे. पंडितजींनी राजा हाथीसिंगसंबंधी माहिती विचारली आणि कृष्णाला ती संपूर्णपणें देतां आली नाहीं– पंडितजी उखडले. नाटकाच्या बाबतींत अशी कुठून तरी 'थीम'–कथावस्तु मिळते. प्रसंग सुचत जातात. संघर्ष स्थानें ध्यानीं येतात आणि मग नाटक Develop होत जाते.

**प्र.** आपल्या **रायगडाला जाग येते** ह्या नाटकाची कुळकथा सांगा ना !

**का.** सांगतो. मला इतिहास आवडतो. पण आपण कधीं ऐति-हासिक नाटक लिहावें ही कल्पनाही माझ्या मनांत नव्हती. अचानकपणें एक दिवस मी रियासतकार सरदेसाई यांचे **"राजा शिवाजी"** हें पुस्तक चाळत बसलो होतो. त्यांत शिवाजीच्या उद्वेगाचा एक परिच्छेद मिळाला. संभाजीचें दुर्वर्तन त्यांत आहे. एका ठिकाणीं तो म्हणतो कीं, माझ्या बापाचें अंतःकरण सावत्र मातेनें व्यापलें आहे. इथेंच संभाजीच्या कथेचा 'जर्म' मला सांपडला. तरीही ऐतिहासिक नाटक लिहावें असें मात्र मनोमन वाटत नव्हते. पण गोवा हिंदु असो.चे भिकु पै आंगले हे मागें लागले. म्हणाले "यांतून चांगले नाटक होईल." म्हणून एक दिवस बसलो आणि झरझर लिहूं लागलो. दहा पानें भरभर लिहिली. भाषा जमली. खूप आनंद झाला. भाषेचा खास असा मी अभ्यास केला नाहीं. पण अडलो नाहीं. कदाचित पूर्वसूरींचें संस्कार असावेत–असले पाहिजेत. that's the only explanation ! !

**प्र.** आपल्या 'मोहिनी' नाटकाबद्दल काय म्हणतां येईल ?

**का.** प्रभाकर पणशीकर माझ्याकडे आले. म्हणाले एक Social Satire हवी. गप्पा मारतां मारतां ते म्हणाले, 'क्रिस्तीन कीलर'चा प्रश्न घेतां येईल काय ? कल्पना सुचली. पौराणिक





संदर्भ लक्षांत आला व 'मोहिनी' हें नाटकाचें नांव निश्चित झालें. मग कल्पना सुचली. उपसंपादक–कांहींतरी खरडतात–तें खरें ठरते–चार मोहिनी येतात ही Situation फक्त सुचली. आणि एकदम लिहिण्याची लहर आली. नेहमीं मला संपूर्ण गोष्ट सुचते. तीन्हीं अंक मला दिसतात आणि मग मी लिहायला बसतो. पण मोहिनीच्या वेळीं असें घडलें नाहीं. कांहींही डोक्यांत नसतांना मी लिहायला लागलो. नांदी झाली. पेशवे+किल्लेदार हीं नावें आलीं–पण 'स्टेशन्स' निश्चित नव्हती. लिहीत गेलो. 'मोहिनी'च्या बाबतींतली Luxury महागांत पडली. सुचले नसतांना कांहीं लिहितां येते कीं नाहीं हें पाहण्याचा प्रयत्न मी केला. पहिला अंक पूर्ण झाल्यावर वाचून दाखविला. चांगला झाला म्हणतांच बेधडक लिहीत गेलों. पण तो प्रयत्न फसला. मनस्ताप फार झाला. आतां मी त्या नाटकावर पुन्हां 'वर्क' केलें आहे. आणि असली महागडी 'चैन' पुन्हां कधीं करायची नाहीं असें मी ठरविलें आहे.

**प्र.** "देवांचें मनोराज्य" हें नाटक लौकिकदृष्ट्या अपेशी ठरलें, त्याची कांहीं मीमांसा ?

**का.** लौकिक यशापयश ही कांहीं वेगळींच गोष्ट आहे. परंतु मी स्वतः मात्र त्या निर्मितीबद्दल अभिमान बाळगतो. लौकिक अपयशांची 'रिस्क' घेऊनही कांहीं निर्मिती होत राहते तेव्हांच कलेची प्रगति होते असें मला वाटतें. तो प्रयत्न हा धोका पत्करूनच मी जाणीवपूर्वक केला होता. मला मानसिक समाधाने मिळालें आहे.

**प्र.** आपल्या प्रत्येक कादंबरींत, नाटकांत आपण कांहीं तरी नवे प्रयोग करतांना, नवे नवे विषय हाताळतांना दिसतां, आपली भूमिका ?

**का.** प्रत्येक कलाकृति हें एक वेगळें आव्हान आहे असें मी मानत आलो आहे. माझ्याशींच माझें सारखें भांडण चालूं असते. मी अस्वस्थ असतो. मी सारखा Evolve होत असतो. त्या घडपडींतून मी रायगडच्या पुढें जाईन असा मला विश्वास वाटतो. माझ्यांतल्या प्रतिगामीत्वाचाच कधीं कधीं मला खूप राग येतो. पण ह्या अंतर्द्वंद्वातून नवनवीन प्रयत्न होत राहतात.

**प्र.** नाटकाच्या निर्मितीच्या प्रक्रियेसंबंधीं कांहीं सांगतां येईल ?

**का.** कथावस्तु सुचणें आणि तिचा आविष्कार होणें ह्या दोन गोष्टी आहेत. सुचण्याचा भाग निःसंशय महत्त्वाचा आहे. पण तो सर्वच कलांबाबत म्हणतां येईल. निर्मितीचा भाग अधिक कष्टांचा आहे असें मला वाटतें. अक्षरशः खडक फोडण्याचें काम निर्माता करीत असतो. नाटकांत तर तें काम अधिक कष्टांचें आहे असें मला वाटतें. त्या माध्यमाला कांहीं स्वाभाविक मर्यादा आहेत. त्या मर्यादेंत कांहीं उभें करावें लागतें. जिवंत करावें लागतें. त्यासाठीं अनेक धागे हातीं धरून ठेवावे लागतात. मागें, पुढें सरकावें लागतें. त्यांचे स्वभाव, त्यांचीं तंत्रें सांभाळावी लागतात. संस्कार करावे लागतात. संपूर्ण संस्कारित झाल्यावर मग तें पूर्ण झालेसें वाटतें. पण तिथूनच खरी सुरुवात झालेली असते.

**प्र.** Writing हा एक Conscious effort आहे असें आपणांस वाटतें काय ? Writing च्या Process संबंधीं कांहीं सांगतां येईल ?

**का.** लेखनांतला विषय सांपडणें, सुचणें हा दैवी भाग आहे असें मला वाटतें. मग मात्र Conscious effort सुरू होतो. मी तर त्याला मजुरीचीच उपमा देतो. तंत्राच्या वरती लक्ष केंद्रित होते व Artistic Sense जेव्हां जातो तेव्हां मात्र धोका संभवतो. कशासाठीं ही निर्मिती ह्या संबंधींच्या विचारांतून जिद्द उभी राहते. कलावंताची तिथें कसोटी लागते. मग शिवाजी, भीष्म यांच्या अश्रूंना मोल चढते. हें सारें मी शरद बाबू व साने गुरुजींपासून शिकलो.

**प्र.** 'रायगड'मध्यें शिवाजी राजांच्या भोंवती जी प्रभावळ आहे ती संभाजीबाबत सतत द्वेषमूलक वृत्तीनें वागत राहते. पत्नीबाबत कांहीं करणें कठिण होते. पण प्रधानमंडळाची वृत्ति ध्यानीं घेऊन त्यांना राखून ठेवणें भाग होते काय ? त्यामुळें शिवाजीला गौणत्व येते असें नाहीं आपल्याला वाटत ? त्याच्या Choice बद्दल व अगतिकतेबद्दल आपलें मत काय?

**का.** अण्णाजी, मोरोपंत हीं माणसें तशीं मोठी होती. पण त्यांच्या मोठेपणालाही अखेर मर्यादा होत्या. तशी ती माणसें Second Rankers होतीं. त्यांना राज्य माहीत नव्हतें. त्यांना राजी राखणें व राबवून घेणें हें शिवाजीला वारंवार करावें लागे. लांचलुचपतीबाबत तंबी देणें भाग पडे. शिवाजी हा Everest होता. भोंवती माणसें अशी होती. संभाजी असा होता. शिवाजीची अगतिकता हा इतिहाससिद्ध







भाग आहे. आमच्या मागें ह्या राज्याची जबाबदारी पेलणार कोण ही त्याची समस्या होती. मी माझ्या मागें दुसरा शिवाजी उभा करूं शकलों नाहीं ही त्याची खंत होती. त्या स्थितींतही तो म्हणतो, "आम्हांला एकवार संधि द्या! पुन्हां आम्ही चमत्कार करून दाखवूं" त्या काळाचीच ती अपरिहार्य स्थिति होती. त्यामुळें शिवाजीला गौणत्व येत नाहीं!

**प्र.** आपल्याला संपूर्ण नाटक Visualise करतां येतें हें कसें काय साधतें ?

**का.** नेमकें उत्तर देणें कठिण आहे. सतत नाटक हाच चिंतनाचा विषय असल्यानें तें जमत असेल. कांहीं नाट्यविषयक संस्कारांचाही भाग असावा. मी भाषेवर प्रेम करणारा माणूस आहे. भाषेची अशी गोडी देतां घेतां येते. शेक्सपियरनें ती दिली आहे. काव्यांत संगीताचा भाग यायलाच पाहिजे असें मला वाटते. आतां नाटकाचा विचार सुरू झाला वा नाटकासाठीं एखादें कथानक सुचलें कीं, त्यांतल्या सिच्युएशन्स भरभर डोळ्यांपुढून सरकूं लागतात येवढें मात्र खरें.

**प्र.** नाट्यलेखनाच्या संदर्भात आपण चर्चा वगैरे करतां ?

**का.** चर्चा करतो. कथानकासंबंधीं, नाटकासंबंधीं, नाटकांतल्या सिच्युएशन्ससंबंधीं मी बोलतो. त्यांतून नाट्य निर्मितीला मदतच होते.

**प्र.** चांगल्या नाटकासंबंधींच्या आपल्या कल्पना काय आहेत ?

**का.** भव्य नाटक मला आवडते, जीवनाच्या अधिकांश जवळ जें नाटक नेते तें नाटक मला आवडते. हॅम्लेटला तसें काय कमी होते ? राज्य होते, प्रेयसी होती. पण तरीही तो स्वतःच्या आयुष्याची 'ट्रॅजेडी' करून घेतो. उलटया गतीनें माणसाचा मोठेपणा दाखवितां येतो.

**प्र.** आपल्या नाटकांपैकीं सर्वात अधिक आवडते नाटक कोणतें ?

**का.** तसें तर मला 'मत्स्यगंधा' हें माझें नाटक आवडतें. पण खरं म्हणजे माझी सारींच नाटकें मला आवडतात. आणि कलावंत–निर्माता म्हणून मी तसें प्रेम त्यांवर केलेंच पाहिजे.

**प्र.** आपल्या नाटकांत भावनेपेक्षां वैचारिकतेला आवाहन अधिक असतें असें आढळतें. कांहीं स्पष्टीकरण ?

**का.** वैचारिक आवाहन जेव्हां कमी पडते तेव्हां माणसें सतत सवंग भावनेला हात घालून हंसू-आंसूचा खेळ खेळतांना दिसतात. मला स्वतःला मात्र असें वाटतें कीं Emotion सुद्धां सबळ व सकारण आली पाहिजे. ह्या माझ्या दृष्टिकोनामुळेंच वैचारिक आवाहन अधिक आलें आहेसें वाटतें.

**प्र.** अलिकडे आपण चित्रपट व्यवसायांत कथालेखक म्हणून नव्यानेंच पदार्पण केलें आहे. चित्रपटांसाठीं जे लेखन केलें त्याबद्दलची आपली प्रतिक्रिया ?

**का.** व्यवसाय म्हणून चित्रपटाचा माझा अनुभव चांगला आहे. लेखनही मला 'प्लेझंट' वाटलें. शांतारामबापूंनीं माझ्यातल्या लेखन शक्तीचा चांगला उपयोगही करून घेतला. पण तरीही चित्रपट हें लेखकाचें माध्यम नाहीं असें मला वाटतें. डायरेक्टर साहित्यिक हवा. चित्रकार हवा. कल्पक हवा. मला स्वतःला चित्रपटांपेक्षां नाटक अजून तरी प्रिय आहे. चित्रपटांत कांहीं खरं नाहीं शांतारामबापूंसारखे कांहीं अपवाद सोडले तर Mature लोक या प्रांतात आज तरी भेटत नाहींत–पटकथा लेखन हें पुष्कळसें एखाद्या Job work सारखें वाटतें. लेखकाची भूमिका–फार तर दिग्दर्शकाला मदतनीसाची राहूं शकेल. तें Medium सर्वस्वी लेखकाचें आहे, असें वाटत नाहीं हें मात्र खरें!

**प्र.** आपल्या वाङ्मयीन वाटचालींत टीकेचा आपल्याला कितपत उपयोग झाला !

**का.** कलात्मक टीका आपल्याकडे एकूण कमीच आढळते. टीका वाचून मी जागा होतो. स्तुती ऐकून वा वाचून मी झोंपी जातो. कलाकृति पुढें टाकायची, त्याविषयींची चर्चा करायची नाहीं, उत्तरें द्यायचीं नाहींत असें माझें धोरण असते पण खरें सांगायचे तर मला टीकेचा फारसा उपयोग झाला नाहीं.

**प्र.** आजच्या मराठी रंगभूमीच्या संदर्भात आपल्याला काय म्हणायचें आहे ?

**का.** 'आजची रंगभूमी' खरं म्हणजे आकार घेते आहे. असामी, वटाटयाची चाळ, यांतून मराठी रंगमंचावर तो तो क्लासवर्ग दिसतो आहे. प्रत्येक काळांत वेगवेगळ्या वर्गांचें असे वेगवेगळे प्रॉब्लेम्स असतात, त्यांच्या मागण्या वेगवेगळ्या असतात. त्या त्या कल्पनांनीं माणसें 'भारावलेली' (Charged) असतात–मी आशावादी आहे. नवनवीन प्रयोग होताहेत.

**प्र.** वरीचशीं प्राध्यापक मंडळीं टीकात्मक लेखनही अधुनमधुन करतांना दिसतात. आपण टीकात्मक लेखन करतांना दिसत नाहीं हें कसे ?

**का.** टीकात्मक लेखन पूर्वी करीत होतो. नवकाव्यावर व अन्य वाङमयीन विषयांवर मी पूर्वी टीकात्मक लेखन केलें आहे. अलिकडे मात्र टीकात्मक लेखन करीत नाहीं.

**प्र.** आपल्या वाङ्मयीन संसाराकडे आपण कधीं वळून पाहतां कीं नाहीं ?

**का.** नाहीं ! मागें वळून पहात नाहीं. कारण असें वळून पाहिले कीं, असमाधान वाटतें. हे सगळे पुन्हां नव्यानें लिहिले पाहिजे असे वाटून त्यावर संस्कार करावेसें वाटूं लागते.

**प्र.** आपलें जीवनविषयक तत्वज्ञान ?

**का.** सर्वच नाटकांतून तें आलें आहे. नवतेचे सारे संस्कार आणि वैफल्य मी पचविले आहे. तरीही पण मी Instinctively Optimistic आहे. वैफल्यवादी नाहीं.

**प्र.** कांहीं अपुरे संकल्प ?

**का.** जिजाई, इथें ओशाळला मृत्यु, लेंकुरें उदंड जाहली, सुसरीने धरलाय् माझा पाय, "अमृतांचीं फळें, अमृताचे वेलीं," आणि "शाळा सुटली पाटी फुटली" हा शाळेवर एक फार्स लिहायचा आहे. शाळेची 'टीचर्स रूम' हाच त्याचा विषय!

**प्र.** आपण लेखनिक ठेवला आहे ?

**का.** नाहीं ! मी स्वतःच लिहितो.

**प्र.** आपला पहिला वाचक ?

**का.** माझी सौभाग्यवति व माझीं मुलें. त्यांना माझ्या लेखनांत फार Interest आहे. ती पद्धत आमच्या घरांतच आहे. माझे वडीलही नवी कविता लिहिली कीं, आम्हां साऱ्यांना आधीं वाचून दाखवीत.

**प्र.** लेखक म्हणून आपलें कांहीं स्वप्न?

**का.** कॉलेजमध्यें मला खूप वेळ मिळतो. तसें स्वास्थ्य आहे. वसतिगृह प्रमुखाचे काम माझ्याकडे आहे. संस्थेंत तसें फार Helpful वातावरण आहे. Treatment फार चांगली मिळते. तरीही पण लेखकानें लेखनाशिवाय अन्य कांहीं करूं नये असें माझें एक स्वप्न आहे. एच. पी. टी. कॉलेजइतके सौहार्दपूर्ण वातावरण मला मिळाले नसते तर या क्षणाला मी नोकरींतून मुक्त होऊन लेखनाला वाहून घेतले असते पण—हा 'पण'च पांढरपेशांना कुठलीहि मोठी उडी घेण्याच्या आड सतत येत गेला आहे नव्हे काय ?

● ● ●

अनुक्रमणिका






# किती रंवाका पवेळ…

—श्रीकान्त पुरोहित



ने हमींप्रमाणेंच फोन आला.
भेटीची उत्कट इच्छा त्यानें प्रगट केली.
खूप विचार करून तिनें होकार दिला—
भेटीचा संकेत ठरला.
ती तिथें वेळेवर गेली - तोही वेळेवर गेला.
पण एकमेकांना भेटूनही ती दोघे
एकमेकांना भेटलींच नाहींत--
छेः कसं शक्य आहे ते ?
पण असं घडलं खरं—



**अबोली** मराठे ही मुलगी मुळचीच फार आनंदी होती. आयुष्यांतल्या लहान-सहान प्रसंगांनीं दुःखी होणें तिला मुळीच मंजूर नव्हते. ती स्वतः हंसतमुख होती. ती दुसऱ्यालाही हरप्रयत्नानें हंसत ठेवी. स्वतःभोंवती आनंदाची आवर्तें खेळवीत ठेवणें तिला फार आवडे. आपलें क्षुल्लक दुःख तिनें तक्रारीच्या स्वरुपांत कधींच कुणाजवळ मांडले नाहीं. अगदीं स्वतःच्या मनालासुद्धां दुखणें खुपणें ती फारसें जाणवूं देत नसे. तिला एकच ठाऊक होतें—ठरलेल्या वेळीं फुलानें जसें फुलावें, संयपणें उमलत तशी ती हंसे. . . आनंदानें.

तिचें सततचे हंसणें पाहून तिचे बरेंच स्नेही तिला गंमतीनें म्हणत, 'मिस मराठे, तुमच्या आई वडिलांनी तुमच्या बाबतींत फार मोठी चूक केली आहे. अज्ञान पांघरीत येणारे हंसू आंव-रीत, डोळे लहान मोठे करीत ती विचारी. . . .'कोणती ? '

'तुमच्या नांवाच्या बाबतींत.

अबोली ऐवजीं खरें तर त्यांनीं तुमचें नांव सदाफुली ठेवायला हवें होतें.'

मग मिस्किल हंसत हंसत तीहि म्हणे, 'आहे ! अजून त्यांच्या चुकीची दुरुस्ती करायला ईश्वरानें वाव ठेवला आहे. कोण ती संधी घेते याच्याच शोधांत आहे मी.'

'पहा बरं ! '





विचारणारे गोड धमकी देत.

अबोली मराठे टेलिफोन एक्सचेंजमध्यें नोकरीला होती. तिथेंही ती आपले आनंदी मुख मिरवूं लागली म्हणजे एखादी तिची मैत्रीण म्हणे—

'सुमे, आपली अबोली ब्रह्मदेशांत जन्माला यायला हवी होती बघ!'

मग ऐकणारी विचारे,

'कां गऽ तिचें नाक काय नकटे आहे होय?' तिच्या भौगोलिक अज्ञानाला हंसून पहिली म्हणे,

'फुकट सुमे, फुकट बी. ए. झालीस.'

अग ब्रह्मदेशाला आनंदी लोकांचा देश म्हणून संबोधतात. दुसरी हंसण्याने अप्रिय रिमार्क पुसून टाकीत म्हणे,

'म्हणून म्हणतेस होय?'

मग अबोली दोघींकडे वळून म्हणे, 'म्हटलं पुरे वरं कां 'ब्रह्मज्ञान'. थोडसं 'आत्मज्ञान' कां नाहीं होत तुम्हांला.'

या टोमण्याला सारीकडून चांगलीच मान्यता मिळे. बांसरीचे वीस-पंचवीस सूर एकत्र मिळावेत तसे अनेक हास्याचे वेगवेगळे नाद एकमेकांत मिसळून एक्सचेंज कलकलून टाकीत.

आतां मिस गुप्तेनें तिला हळूच दंडाला चिमटा काढला. त्याची सव्याज फेड व्हावी यासाठीं ती संधी शोधीत असतानांच तिच्या नांवाचा पुकारा झाला.

रात्रीचे अकरा वाजत आले होते. स्वीचबोर्ड हेवी होता. लाईन्स एंगेज्ड होत्या. बोर्डावर रंगीत लाईट. पांखरांच्या चिमुकल्या पंखाची उघडझाप व्हावी तसें वरचेवर लागत मिटत होतें. बाहेरून कॉल्सची गर्दी होती. खरटर आवाज तिला अधिकच कार्यदक्ष करीत होता. आज ती एन्क्वायरीच्या नंबरवर होती. सर्व नंबरात मजेचा, गंमतीदार पण थोडा अधिक कामाचा असा हा नंबर होता. टेलीफोन दुरुस्तीच्या तक्रारीपेक्षां इन्क्वायरीवर येणाऱ्या हृदयाच्या तक्रारी, गफलती, असहाय, दर्दभरी विचारपूस फारच मनोरंजक होती. करमणूक अन् विनोद या रंगछटा त्या नंबरवर अधिक उजळून निघत. संथ पसरणारी नीरव शांतता, वातावरणाची मिटणारी कळी....

कधीं कधीं अशा वेळेस मन बेचैन होते. अस्वस्थ वाटूं लागेल, पण अबोली प्रसन्न होती. येणारे कॉल्स तत्परतेनें, गोड बोलून ती माहिती पुरवीत भराभर उरकीत होती. तेवढ्यांत तक्रारीच्या नंबरवर बसलेली डिलीमा तिला पुकारीत म्हणाली,

'मराठे सम् स्वीट व्हाईस वॉन्टस् यू !'

त्याबरोबर साऱ्या मुली चिमण्यांसारख्या चिवचिवाट करीत मोठ्यानें हंसल्या.

गेले कित्येक दिवस तो फोन नेमानें तिला येत होता. बहुश: ती इन्क्वायरीवरच असे. पण गेले तीन चार दिवस डिलीमा गैरहजर असल्यानें अधून मधून ती तक्रारीच्या नंबराकडेहि पहात होती. गेले चार दिवस तिनें तो गोड आवाज तक्रारीच्या नंबरवर रिसिव्ह केला होता. आज तिनें कामाचा नंबर बदललेला त्याला कळण्यास कांहींच मार्ग नसल्यानें त्यानें तिला तक्रारीच्या नंबरवर कॉल दिला होता. डिलीमानें त्याचा जाहीर बोभाटा केला होता. तिला कसेसेच वाटलें. तिला कोणातरी तरुणाचा फोन येतो ही बाब गुप्त नव्हतीच. कुठल्याहि परिस्थतींत तिला आलेला फोन साऱ्यांना कळत होता. ते रहस्य लपवावें ही तिची कधींच इच्छा नव्हती. तिच्या दृष्टीनें तें रहस्यच नव्हतें.

मात्र अलिकडे संबंधांचे रेशमी तंतू निकट येत परस्परांत गुंतू लागले होते. तिला धागे गुंतवावे असे वाटतानाही गुंतागुंत नको होती. आलेला कॉल सफाईनें घेत तिनें विचारलें,

'हॅलो, मिस् मराठे स्पीकिंग,'

'मी हेमंत देवधर बोलतो आहे. लाईनवर आज लेट आलांत? तुमचा नंबर बदललेला तर नाहीं ना आज? मी तुमची चवकशी करूं लागलों, तेव्हां समजलें तुम्ही दुसऱ्या नंबरवर आहांत. प्रथम तुम्ही इथें नाहींत असें इथल्या नेहमींच्या रीतिरिवाजाला अनुसरून त्या मला डावलूं लागल्या पण मी कसला चवकशीनें पिच्छाच पुरवला त्यांचा.....'

'म्हणजे तुम्हीहि तुमचा रीतिरिवाज सोडला नाहीं अंऽ!'

'पिच्छा पुरवण्याचाच रिवाज मी फक्त पाळतो होय?'

'मी कुठें तसें म्हणते?'

तुम्हीं आणखी कितीतरी रिवाज पाळत असाल. पण इथें आम्हांला वांटयाला येतो तो हाच रिवाज. तुम्हींच नाहीं, तुमचे इतर बंधू रिवाजाचें विविध प्रकार पाळतांना आम्हांला पळतां भुई थोडी करतात?

'मी मात्र आज नव्या रिवाजानें तुम्हाला पळवून लावण्यापेक्षां थोडे जवळ आणणार!'

'काय म्हणतां?'

'प्लीज रागावूं नका. एकाद्या व्यक्तीशी ओळख झाल्यावर आपण त्या व्यक्तीला आपल्याकडे घरीं चहाला बोलावतो. निदान कुठेंतरी भेटायचे निमंत्रण खासच देतो. माझी फक्त तेवढींच इच्छा आहे. तुम्हीं मला तुम्हाला सोईस्कर असलेल्या जागीं भेटा. फोनवरुन मी व्यक्त केलेल्या कांहीं इच्छा तुम्ही आजवर मानल्या. आतां फक्त ही अखेरची पुरी करा....खऱ्याखुऱ्या अर्थानें तुम्ही सुरेखाची जागा भरलींत तिथें ऑफिसमध्यें, इथें माझ्या जीवनांत, मला तिनें अखेर फसविलें. तुम्ही....अजून....?'

'वाक्य अर्धवट तोडलेत, पुरें करा कीं.'

'वाक्य पुरे करण्यापेक्षां पुरी ओळख करण्याच्यामागें मी अधिक आहे.'

'तुम्ही 'अधिक' आहांत हें पटलेंच आहे. पण सध्यां भेटण्याच्या विचारांत नाहीं मी.'

'सध्यां नाहीं मग केंव्हां?'

'केंव्हांतरी, पुढें योग्य वेळेला.'

'माझ्यावर वेळ ओढवली तरी अजून योग्य वेळ आलीं नाहीं?'

'आतां यापुढें येईल——'

'खरें तर यापुढें मला कांहींच दिसत नाहीं. उदास भविष्य, शून्येच शून्यें.'










अनुक्रमणिका

'पुन्हां तुम्ही पूर्वीसारखे बोलायला लागलांत ?'

'पण तरीहि तुम्ही पूर्वीसारख्या वागत नाहीं!'

'बोलण्याच्या ओघाला कारुण्याची गहिरी छटा येऊ लागल्यावर अबोली बदलली. कांहींशा हंसऱ्या सुरांत त्याला म्हणाली.

'हें पहा मी विचार करून सांगते.'

'खरेंच तुम्ही विचारी आहांत.'

'तुमच्या अविचारामुळें व्हावें लागते, मला कधींकधीं विचारी!

'उद्यां सांगाल,?' याच वेळेस फोन करतो.

'बघते.'

'बघूं नका ठरवाच आतां.'

'हेमंत माझें ऐका, अरूपांत हित असतं. आनंद असतो. अप्रगट, अव्यक्त गोष्टीच जीवनांत सौंदर्य प्रकर्षानें साकार करीत असतात. भेटण्यापेक्षां केवळ बोलणेंच आपलें जीवन अधिक सुंदर करेल.'

'पण हें सारे ठरविण्यापूर्वी एकवार भेटणें आवश्यक आहे.'

माझी खात्री आहे. भेटीनेंच वयावर एक अनोखा स्वप्निल साज चढतो.'

'माझी खात्री आहे भेटून तुमची निराशा होईल. तुमच्या कल्पनेइतकीं मी सुंदर नाहीं. शिवाय अपेक्षिलेलें भेटींत बहुसंख्य वेळां घडत नाहीं. नको तें नाहीं त्या रूपानें जन्माला येते. अपेक्षा भंग होतो. मग पटतें. दुराव्यांत सौंदर्य अधिक आहे. जवळ येण्यांत संघर्षाची कळी खुलतें. अहंतेचा, मीत्वाचा अधिकार गाजवण्याची ईर्षा निर्माण होतें. शिवाय मनानें कल्पिलेलें व प्रत्यक्ष दिसणारें यांची सांगड कधींच बसत नाहीं. तिथूनच दुःखाचा जन्म होतों. ओळख काळवंडून जाते.'

'माझें मन सांगते आहे. ठरीव चाकोरींत ठराविक आचार पाळणाऱ्या व्यक्तीपेक्षां तुम्ही सर्वस्वी निराळ्या आहांत. तुम्हीं अगदीं वेगळ्या आहांत. तुमची वागणुकीची धाटणीही नवी 'अन् सुखावणारीं आहे. एखाद्या भेकड माणसासारखी सुरेखा न सांगता सवरतां माझ्या जीवनांतून दूर निघून गेली. निर्णय अथवा नवा निश्चय सांगायचे धाडस तिच्यांत नव्हते. मी फोनवरून तिची चवकशी करूं लागलो कीं साऱ्या मुली मला हंसत हंसत झिडकारून टाकायच्या, उडवाउडवीची उत्तरें द्यायच्या. तुम्ही मात्र तसें केलें नाहींत. तुम्हीं मोकळेपणानें तुमचे नांव सांगितलेंत. मला हवी असलेली माहिती शक्य तेवढी पुरवलीत. कधींहि मला अव्हेरलें नाहींत. माझा त्रास सहन केलांत. तुम्ही प्रेमळ आहांत. फार फार गोड आहांत. या तुमच्या मूल्यानीं माझ्या मनांत रंगविलेला तुमचा चेहरा विलक्षण सुंदर आहे. मला खात्री आहे. तुम्ही सुंदर आहांत. नव्हे सध्यां माझी तीच निष्ठा आहे. फुलांपेक्षां सुगंधी, मधुर आलापापेक्षां गोड असलेलें तुमचे व्यक्तित्व सुंदर नसेलच कसें ?'

"बरं तें पाहूं आपण नंतर. तूर्त बोलण्यावर पडदा—मध्यंतर!"

'कॉल्सची फार गर्दी आहे. आपण फारच बोललो.'

'अच्छा आतां रजा घेतो. मग उद्यां नक्की हं ?'

'हो उद्यां कळवते. आभार....

'ते मीच तुमचें मानायला हवेंत........

'मी तुम्ही फोन खालीं ठेवलांत या कल्पनेनें मानलें....'

दुसऱ्या टोंकाकडून येणारा हसल्याचा आवाज दुर्लक्षीत तिनें फोन डिसकनेक्ट केला. दुसऱ्या कॉलला जागा दिली. संथपणें ती आठवूं लागली, गेल्या दोन चार महिन्यांतले तिचें त्याचें टेलिफोनवरचे बोलणें...सुधारणा पाहून ती सुखावली...तिनें जन्माला घातलेले बी रुजलें होतें.....

खरें तर मैत्री हा जीवनांतला योग आहे. ती मात्र या मैत्रीकडे प्रयोग म्हणून पहात होती. नव्हें तिनें तो प्रयोग कसोशीनें सुरू केला होता. ही मैत्री, कोवळ्या वयांतली अबोध, नवख्या स्वप्नासारखी नव्हती. तसें तारुण्याच्या अखेरच्या उतरत्या काळांतील ही मैत्री—आगाऊ सलगी नव्हती. मैत्रीसाठीं आसुसून जावें इतकी ती निबर झाली नव्हती. आर्जवी, लाघवी आनंदी या तिच्या हुकमी स्वभावछटा योजून पहाव्यात इतकी नवथरही ती नव्हती. एक अहेतुक, निरपेक्ष स्नेह जन्माला घातला होता. श्रावणांतल्या नांव नसलेल्या एखाद्या नवीनच झुडपावरच्या फुलासारखा. सध्यां तरी त्याचे रंग आकर्षक होतें. नवथर वाऱ्यावर डुलतांना तें देखणें दिसत होते.

तीन चार महिन्यापूर्वीचा काळ तिला आठवला. मनांतल्या असंबद्ध बावटळी...

त्यांच्या इथें काम करणाऱ्या सुरेखाला नेहमीं फोन येई. फोनची वाट ती विलक्षण आतुरतेनें पाही. फोनवर बोलतांना

तिच्या चेहेऱ्यावर नवे नवे इन्द्रधनुष्य फुलविणारा भावांचा श्रावण. तिचे मन भिजून कसें सुवासिक झालेले असायचे तिच्या डोळयांत हेलावणारे आनंदी जलाशय....ती नटत होती. फुलत होती. दिवसेंदिवस नवी, लोभस घडत होती. साऱ्यांना तिचा हेवा वाटत होता. एका तरुण व्यक्तीचा फोन तिची लावण्यकळा आगळी-वेगळी घडवीत होता. साऱ्या दिवसांचे गोड स्वप्न करीत होता. एक गोड गीत जुळत होते.

एक दिवस नवाच संशय साऱ्या हेवा वाटणाऱ्या मुलींच्या छोटयाशा जगांत निर्माण झाला. सुरेखा बदलली होती. अधुन-मधून रजेचे सत्र तिनें सुरूं केले होते. पहातां पहातां तिच्यातला नवा नव्हाळीचा स्वप्निल बहर ओसरूं लागला. पालटलेल्या ऋतुं-तल्या वेलीसारखी ती आपली झळाळी गमावून वावरूं लागली, तिनें नव्या काळजीच्या पटलांत आपलें मन गुंतवलें होते. वरवर नवा निश्चय चोरटयासारखा तिच्या मनांत वावरत होता. झुकांडी द्यायची! पुरेशी तयारी झाल्यावर येणारा फोन ती चुकवूं लागली. कधीं तिनेंच फोन घेतला तर उडवाउडविच्या उत्तरानें ती, कांहीं क्षणांत त्या फोन करणाऱ्या व्यक्तीची वासलात लावे. पूर्वीची ओढ सरली होती. वेड नाहींसे झाले होते मग नवा व्यवहार, नाट-काचे धडे गिरवूं लागला. तिनें आपल्या मैत्रीणींना येणाऱ्या फोनला टाळण्याची सूचना केली. साऱ्या ती अंमलात आणुं लागल्या. मग तो तरुण अधिकच हवालदिल झाला. रोज फोन करून तो विचारूं लागला.

"सुरेखा फडके आल्यात?"

"त्यांना थोडा वेळ बोलवा ना....माझे थोडे काम आहे त्यांच्याशीं." कधीं त्याला उडवाउडवीचे उत्तर दिले जाई. कधीं त्यांचा फोन येतांक्षणींच डिसकनेक्ट केला जाई. त्याची स्थिती क्षणोक्षणी बिकट होत होती. वांटयाला आलेल्या दु:खानें तो लाचार झाला होता. अगतिक होऊन तो निर्माण झालेलें दु:खाचे धुकं वाटण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत होता.

सुरेखाच्या राजीनाम्याचे निश्चित झालें तेव्हां बोली मराटे हिला टेलिफोन एक्सचेंजमध्यें बोलावण्यांत आले. तिची चांचणी परीक्षा पूर्वीच झाली होती. तिला कामाचा अनुभवही चांगला होता. ती आल्यावर कांहीं दिवस सुरेखा कामाला येत होती. इन्क्वायरीच्या नंबरवर ती डयुटीवर होती. रात्रीं दहाच्या सुमा-रास फोन येऊन थडकला.

'हॅलो, सुरेखा फडके आहेत ?'

स्वर हळू होता. त्यांत आवाजातली कापरी आर्तता, अंतरातली हळुवार ओढ ती हेलावून गेली. गेले कांहीं दिवस रोज कुणाचा तरी फोन डावलला जातो हे तिला अंधुक आठवत होते. कदाचित तो हाच फोन असेल, कदाचित तो हा फोन नसेलही या शंकेच्या लक्ष्मणरेषेवर घोटाळतांना ती त्या आर्त आवाजाने संभाषणात ओढली गेली. खाजगी चौकशा शक्यतो टाळण्याचा तिथला अलि-खित नियम तिने नकळत मोडला. क्षणार्धांत ती बोलून गेली.

'तिने नोकरी सोडली. आतां ती पुन्हां इथे येणार नाही. तिच्याच जागेवर माझी नेमणूक झाली आहे.' पडलेल्या आवाजांत त्यानें विचारले—

'केव्हां सोडली तिनें नोकरी...फार दिवस झाले का. मला कांहींच कळले नाहीं.'

एका थरथरणाऱ्या भावनेत त्यानें भराभर वाक्ये उच्चारली तरीही झालेल्या दु:खाची चाहूल त्यांत लपली नाही. तिला डोळया-पुढें दु:खाने अवघडलेला त्याचा चेहेरा दिसूं लागला...तिला मनस्वी वाईट वाटले. गोडव्यानें कठोर सत्य उघड करीत ती म्हणाली,

'आठ दहा दिवस झाले. तिचे लग्न झाले म्हणून तिने नोकरी सोडली.'

मग तीला ऐकू आला तो टाकलेला दीर्घ श्वास...करुण सुस्कारा...पाठोपाठ फोन बंद झाला. त्याला त्या बातमीनें धक्का बसला होता. कमालीचे दु:ख झाले असावे. ती कळवळली. दु:खात पुटपुटली...स्वत:शीच. एकुण मन या वयांतच नाजुक होते; अन् या वयांतच मनाला कठोर चांव सहन करावे लागतात या वयांतच प्रेम मंजिऱ्या धारण करते. अन जखमहि याच वयांत होते. मनांत उसळलेले विचार आणि उफाळलेल्या भावना यांच्या मीलनात तिचे मन हरवले.

दुसऱ्या दिवशी पुन्हां तिला तो फोन आला. तिचा आवाज ऐकल्यावर प्रथम त्यानें तिचे आभार मानले. आश्चर्यानें विचारले,

'आपण कसा काय माझा फोन रिसिव्ह केलात् ?

गेले कित्येक दिवस मी फोन करतो आहे. पण सारीं तपस्याच वांया जात होती. साऱ्या मुली फोन डिसकनेक्ट करीत होत्या तुम्हीं नवीन होतांत म्हणूनच माझे भाग्य. एरवी मी अज्ञानांत, दु:खात असाच असहायपणें चांचपडत राहिलो असतो. माझे एक छोटेसे काम कराल काय ?






'प्रयत्न करीन.'

'फार उपकार होतील माझ्यावर'

'तें बोलून, दाखविलें नाहींत तर तुमचेही माझ्यावर कांहीं उपकार होतील'

'रागावलांत? माणूस दिलगीर झाला म्हणजे लाचारीची भाषा आपोआप ओंठावर येते.'

'लाचार होण्यापेक्षां कांहींही व्हावे माणसानें.'

'दुःख दाराशी येऊन उभें राहिले म्हणजे हें उदात्त विचार सुचत नाहींत. सगळ्या सुंदर मूल्यावर अकस्मात दरोडा पडतो.'

'तत्वज्ञानापेक्षां आपलं काम सांगा. मी ड्यूटीवर आहे; नवीन आहे.

'सुरेखाचा नवा पत्ता मला देऊं शकाल ?'

'मजजवळ नाहीं, पण मिळवण्याचा प्रयत्न करेन'

'बरं अच्छा ! फोन करतो, आतां एकच विचारतों–अखेरचें.'

'काय ?

'तुमच नांव सांगतां ?

'अबोली मराठे.'

'अबोली, फक्त तुम्हालाच वाचा आहे. बाकीचे एक्सचेंज मुक्यांत जमा आहे.'

तिसरा दिवस. तीच वेळ. पुन्हां त्यांचा फोन आला. पत्ता मिळाला नाहीं ह्याचें तिला फार दुःख झालें. प्रयत्नाची ग्वाही देण्यावांचून तिच्या हातांत दुसरें कांहींच नव्हत. हवें तें न मिळाल्यान त्याची निराशा वाढली. व्यथेच्या गडद छटा शब्दांत रंगवीत त्यानें एकाएकी तिला विचारलें.

'माझी एक विनंती मान्य कराल ?'

तिच्या मुग्धतेला होकाराचें स्वरूप देऊन त्यानें आपली मागणी मांडली.

"मला आपल्याला अधून-मधून फोन करण्याची परवानगी द्याल ? ही रात्रीची वेळ मला विलक्षण अस्वस्थ करते. मी शुद्धबुद्ध विसरून फोनकडे धांव घेतो. फार ओढीनें मी सुरेखाला फोन करायचो. फार वेगळें-अमोल सुख होते त्याच्यांत. ती सारी शब्दांची, ओढीची दुनिया उधळून सुरेखा गेली. मजजवळ उरला आहे तो फोन. ती धुंद आठवण . . . त्या ओढीची संवय . . . चटक." तिच्या मुखातून केव्हांच होकार निघून गेला होता. भावनेच्या झंझावातात ती पुनश्च सांपडली.

आजवर दुःखाची सांवली तिनें कटाक्षानें टाळली होती; त्याचा तिला तिटकारा होता.

भावनेच्या अक्षय तांडवात हेलावणाऱ्या सागराकडे ती खेचली जात आहे हें तिला जाणवत होतें. तिला सुरेखानें केलेली चूक पुन्हां करायची नव्हती. तिला त्या तरुणाला सुखवायचे होते. जें अकारण दुःख जन्माला आलें होते तें सहज उधळून टाकायचे होते. ते दुःख परंपरा निर्माण होण्यापूर्वीच नष्ट होणें हितावह होते. तिची कल्पना होती या वयांत कोणीच दुःखी असूं नये. आनंदाला, सुखाला वैभवशाली पैलू पडतात तें याच स्वप्निल काळांत. इथें सारें सुखयांत्रिक असायला हवेंत. जीवनाच्या चित्रांतला सुख हा मोठा आकर्षक रंग आहे.

. . . .या तरुण वयांत जेव्हां जीवनाचे चित्र रेखाटलें जातें ते याच रंगाने रेखाटलें जाते. पण सारे तिला दूर राहून करावयाचे होते. हेतुशुन्य त्रयस्थपणें, कशाचीच अपेक्षा न बाळगतां—क्षणभर तिला वाटलें या तरुण वयांतही एक नवा खेळ मांडावा स्नेहाचा ! मैत्रीचा ! सोनेरी दिवस जमावेत. आनंदाच्या सुखाच्या घटका जमवाव्यात. तो खेळ बालपणीच्या भातुकलीसारखा असावा. लुटुपटीचा, क्षणकालाचा ! कांहीं क्षण आनंदानें, सुखानें महिरून टाकावेत. त्या सुगंधाच्या दरवळानें भावी जीवित सुसह्य होईल. मांडलेला खेळ क्षणभरांत सरेल. पण उरणाऱ्या गडद, धुंद स्मृतींत जीवनाला शाश्वत स्वरुपाची सांवली सापडेल. तोच पुढचा आशादायी आधार या चिमुकल्या खेळांत पेरावा. यानेंच तो तरुण–तसें तरुण आनंदी होतील.

नवी कल्पना तिनें अंमलांत आणायला सुरुवात केली. मग हेमंतचे दुःख ओसरूं लागलें. त्याचा रोज फोन येत होता. ती तो घेत होती. मांडलेला खेळ हळुंहळूं रंगू लागला.

कालच त्यानें तिला भेटण्याविषयीं सांकडें घातलें होतें. इतके दिवस फोनवरच्या संवादांत रंगलेल्या त्या खेळाचें भवितव्य धोक्यांत आल्याचा तिला भास होऊं लागला.

काय करावे ? या खेळाचे रुपांतर तिला केवळ हलक्या आनंदात करायचे होते. उफाळलेल्या लाटेने किनाऱ्याच्या निकट जाऊन त्याला हळूवार स्पर्श करावा. दुसऱ्या क्षणीं आपला मोहरा वळवून अफाट सागरांत विलीन व्हावे, आगामी नात्याची निश्चित ग्वाही घेऊं नये. एका क्षणांत–एकाच रंगानें जीवन रंगवून जावे. असाच कांहींसा तिचा खेळ होता. पण इथें तर स्नेहाची पर्वतप्राय लाट तिच्यावर चालून आली होती. क्षणभर तिला वाटलें. आपल्यासमोर पसरलेल्या, खुणावणाऱ्या वाटा धुक्यांत बुडाल्या आहेत. न जाणो. यांतल्या कांहीं एखाद्या कड्याच्या तोंडाशीं जाऊन पोंहचत असतील.

तिनें गुप्ताकडे पाहिलं. तिच्या डोळ्यांत झोंपेच्या सावल्या जमल्या होत्या. सव्याज चिमटा परत करायचें तिनें उद्यांवर ढकललें. डिलीना कुणाशीं तरी फोनवर बोलण्यांत दंग होती. साऱ्याच मुलीं कामांत दंग होत्या. डिलीमाचा फोन संपल्यावर अपेक्षेनें तिनें सर्वदूर नजर फिरविली. कुणीतरी फोनबद्दल विचारावें, चिडवावें ही आशा तिच्या डोळ्यांत खोडकर मुलीसारखी उभी होती. ऑफिसमधला उत्साह, रंग नाहींसा झाला होता. मग अबोलीनें डिलीमाला विचारले.

'कुठल्या गोड आवाजाशी एवढी बोलण्यांत रंगून गेली होतीस ? खात्रीची पताका मिरवीत ती उत्तरली . . . "बहिणीशी !"

'कुणाच्या . . . . . . एखाद्या . . . .

'ओ नो, माझ्या स्वतःच्या'.

'काय करते ती ? '

'नर्स आहे.'

'अरे वा साम्य आहे तुमच्या व्यवसायांत ?'

'कसलें ? डिलीमानें डोळे नाचवले.'

'यू ऑपरेट द फोन अॅण्ड शी ऑपरेटस् द पेशंटस्.'

अनुक्रमणिका






त्या विनोदावर कांहीं मोकळेपणानें हंसल्या. तो दिवस संपला.

दुसरा दिवस उगवला. एक बावरी उत्सुकता तिच्या मनाच्या दाराशीं उभी होती. खेळांतला फसवा, निर्णायक, कांहींसे महत्त्वपूर्ण वळण दाखवणारा बिंदू येऊन ठेपला होता. रोजची वेळ. साधत तो फोन आला. . . . सुरुवात संपल्यावर उपचार झटकीत. अधीरतेनें त्यानें विचारलें. . . . .

'काय ठरलं तुमचं ?' केव्हां भेटतां' मोठ्या सफाईनें त्यानें. प्रश्न विचारलें. पण ह्यांत जोर नव्हता. विचूकपणें तिनें सांगून टाकलें.

'तुम्हांला भेटायचे ठरविले आहे मी. उद्यां भेटूं ? सवड आहे ना तुम्हांला उद्यां ?" अपेक्षेबाहेर त्याची अपेक्षा पुरी करणारे उत्तर ऐकल्यावर तो कांहींसा गोंधळला. संशयानें त्यानें पुन्हा विचारलें. . . . 'तुम्हीं सारें खरें सांगतां नां हें ? मागून तुम्ही कुठल्यातरी सबबीवर हा घाट उधळून तर लावणार नाहीं नां ?

त्याची शंका ऐकून ती हंसत सुटली. गांभीर्याचा लटका आवाज काढीत म्हणाली 'मी बोलणारी 'अबोली मराठे ! ईश्वरसाक्ष सद्विवेकबुद्धीला स्मरून निश्चितपणें सांगते कीं, मी उद्या तुम्हाला भेटणार आहे. कुठल्याही सबबीखाली अथवा क्षुल्लक कारणामुळें भेट डावलली न जाण्याची दक्षता घेतली जाईल याची दखल घ्यावी.'

मग त्यालाही हंसू कोंसळलें. ते आंवरतां आंवरतां पुढचा संवाद दोनचार क्षण तिष्ठत उभा राहिला. तो म्हणाला,

'तुम्हांला कोणी कोर्टांत उभें केलेंले नाहीं बाईसाहेब.'

'पण उलटतपासणी कोर्टासारखी चालली आहे.त्याचें काय ?'

'बरं उद्यां किती वाजतां, कुठें भेटता ?' तुम्हींच हॉटेल ठरवा.'

'मला हॉटेलची विशेष माहिती नाहीं.'

'कॅफे पॅरीसमध्यें येतां. युनिव्हर्सिटीसमोर ?'

'इतक्या दूर ?——बरं येतो.'

'किती वाजतां ?'

'बरोबर पांच वाजतां संध्याकाळीं.'

'मी अर्धातास अगोदर येऊन दारांत उभा राहीन.'

'अर्धा तास अगोदर कीं उशीरा ?'. . . .

'उद्यां पाहालच. पण आपण एकमेकांना ओळखायचे कसें ?' कुणीच कुणाला आजवर पाहिलेले नाहीं. ओळखण्यासाठीं कांहीं खूण ठरवूं.'

'मी सबंध लाल पोशाखांत येईन. अगदीं चपला पर्ससुद्धां लाल.'

'कृपा करून रागानें मात्र लाल होऊं नका.'

'मी निळा छोटासा रुमाल हातांत ठेवेन. तुम्ही निळा सूट घाला. लाल टाय बांधा.'

भेटीची पूर्वतयारीची रुपरेषा काळजीपूर्वक आंखली गेली.

पांचला दहा मिनिटें असतांना बँक ऑफ इंडियाची बाजू क्रॉस करून कॅफे पॅरीसच्या रोखानें एक मुलगी भराभरा चालत येत होती. तिनें सबंध पोशाख लाल केला होता. हॉटेलच्या दाराजवळ निळ्या सुटांत एक तरुण वाट पहात होता. जवळ येतांच तिनें आपल्या हातांतला निळा रुमाल उंचविला. टायवर खुणेचें बोट किंचित् हवेंत उचलून त्यानेंही तिचे स्वागत केले. दोघेंही निकट येत हॉटेलांतल्या वरच्या भागांत गेले. फारशी वर





अनुक्रमणिका

गर्दी नव्हती. कोपऱ्यांत एक आकर्षक तरुण पॉकेट साईज आंग्ल पुस्तक वाचीत बसला होता. दुसऱ्या कोपऱ्यांत दिसेल न दिसेल अशा बेताने एक सुंदर तरुणी मण्याची पर्स बनवीत होती. तिचे लक्ष दाराकडे होते. कुठल्याही क्षणी तिला तिचा माणूस भेटायला येणार होता. ती दोघें मधल्या रिकाम्या टेबलापाशीं बसली. एकमेकाकडे निरखून पाहूं लागलीं ....तिचे दांत प्रमाणाबाहेर बाहेर आले होते. तिच्या हंसण्याच्या आवाजाला पिचलेल्या वाघाच्या स्वराची किनार होती. तिचे केंस तोकडे होते. ती आडव्या अंगाची होती कपाळ चिंचोळे वर्णानें ती पूर्ण काळी होती. तो उंचीनें कमी होता. त्याचाही रंग दक्षिण भारतीय होता. बोलतांना तो "अँड" असा उद्‌गार काढे, ती तरुणी वयामुळें कपड्याच्या रंगसंगतीत तरीहि चांगली दिसत होती पण प्रथमदर्शनीच पहाणाऱ्याचा ग्रह विघडत होता. त्यालाही निळा सूट बरा दिसत होता. आंग्ल गीतांतले रोमांचक सूर त्यांची पहिली, वहिली भेट रंगवीत-सजवीत होते. विलक्षण दडपणाखालीं वावरतांना ते बावरले....तरीही सुखावले....,किती तरी वेळ निघून गेला. भेट संपली.

दुसऱ्या दिवशीं पुन्हां त्याचा फोन आला. आज त्याची तिला अपेक्षा नव्हती

'सॉरी हं.'

'एक्सक्युज मी!'

'कां बुवा'....निराशा झाली?

तुमचा अपेक्षाभंग झाला तर नाहीं नां?'

'अपेक्षाभंग झाला नाहीं' पण अपेक्षा पुऱ्याही झाल्या नाहींत. तुमचा गोड आवाजाइतके वागणुकीइतके तुमचे रुप, गोड नव्हतें. मला वाटलं होतं ....

'पण त्याची मी तुम्हाला पूर्वीच कल्पना दिली होती. कुठल्याही तऱ्हेनें यांत फसवणूक नव्हती. असाध्याचा ध्यास माणसानें करूं नये. हे पूर्वीच मी आपल्याला सांगितलें होतें.'

पण मला वाटलं होतं. तुमच्या उदात्त वागणुकीच्या सहवासांत मीहि उदात्त विचार अंगीं बाणूं शकेन. तुम्ही थोड्याशा रुपानें डाव्या असल्यात तरी मी पुन्हां जीव जडवून या जीवनांत रंगू शकेन. पण प्रत्यक्षांत रुप नसलं म्हणजे त्याग, उदात्तता, तडजोड कांहीं कांहींच हाताशीं उरत नाहीं. 'या वयांत' याचा अनुभव आला मला. हे वय केवळ रुपासाठीं असतं, रुपावर चालतं. तोंच जीवनाचा आराध्य, मध्यबिंदू आहे.

'माझीही आशा फळाला आली नाहीं. मी तुमच्या लीनतेवरुन गोड संभाषणावरून चितारलेलें चित्र सुसंस्कृत पण सुंदर होतें. एक देखणा निदान स्मार्ट तरुण......'

'माफ करा हं. अबोली मराठे...तुम्ही ज्या निळ्या सुटांतल्या माणसावर लक्ष्य केंद्रित केले होते तो मी नव्हतो; तो माझा मित्र. कधींहि आयुष्यांत असले गोड सुख न भोगूं शकणारा. त्याला मी माझ्या जागीं पाठविले. तुम्ही सुरेख असतात तर मला प्रतिक्रिया पहायची होती. मीहि तिथेंच होतो. एका कोपऱ्यांत. पॉकेट साईज बुक वाचीत. शास्कीनच्या सुटमध्यें. मी तसा बऱ्यापैकीं रुपवान् आहे....मी पुन्हा माफी चाहतो....'

म्हणजे तुम्हीही माझीच पद्धत अवलंबिलीत हं. मी सुद्धां माझ्या कुरुप मैत्रिणीला मुद्दाम पाठविलं. म्हटलं तुमच्या बाह्य सौंदर्यापेक्षां तुमच्या हृदयाचं सौंदर्य पहावं.

'म्हणजे तुम्ही लाल पोशाखांत आलां नव्हतात?—कोपऱ्यांत त्या टेबलावर पिवळ्या साडीत लांबसडक वेण्या सोडून वसलेल्या फारच आकर्षक दिसणाऱ्या, मण्याची पर्स विणणाऱ्या तरुणी म्हणजे तर तुम्हीं नव्हतांत ना?'

अरे वा! बरेंच दिसता कीं, तुमचे आजुबाजूलाच लक्ष्य अधिक होते. एका तीरांत दोन लक्ष्य साधणारे तुम्हीं धूर्त तिरंदाज दिसतां.

'तुम्हीं, नव्हतां वाटतं माझ्याकडे चोरून पहात?'

'मी निसर्गाची बांधली होते.

'आतां पुन्हां भेट?'

'अशीच केव्हांतरी!'

'त्यानें विचारलेला प्रश्नच खेळ रंगल्याची ग्वाही फिरवीत होता. इथेंच कुठेंतरी थांबायला हवं होतं. ●●●



अनुक्रमणिका








अनुक्रमणिका



-दिलीप पु. चित्रे

**"मी लिहितोय् आत्मचरित्र, प्रवासवर्णन नव्हे. तरी लिहिला जातोय् ढोबळ ढाचा. त्या त्या क्षणीं जें झालं त्याचं स्वरूप उघडत नाहीं. फक्त त्यावर पेनचे अपेशी ओरखडे उठतात. अस्तित्वाचा उभा आक्रोश साक्षर होत नाहीं. जाणीवेचं जोखड मानेवर भयंकर होत जातं......"**

**एक** दिवस माझ्या खिशांत पांचसहाच डॉलर उरले असल्याचं माझ्या लक्ष्यांत आलं. हॉस्पिटलचं प्रचंड बिल् दिलं होतं तेहि पैसे उसने घेऊनच. मग मी बँकेंत गेलों आणि कर्ज काढून देणीं फेडलीं. आदिस अबाबांतच घर भाड्यानें घेतलं आणि आदिस अबाबालाच बदली करून घेतली. बँकेचं कर्ज एक वर्षांत हप्त्याहप्त्यानें फेडायचं होतं आणि मित्रांची देणीं फेडण्यापेक्षां माझ्या मनाला हेंच वरं वाटलं असतं.

सुट्टी चालूंच होती. माझे मित्र सीमा इलाला आणि गेताच्चो माकाशा ह्यांच्या ओळखीनें मला घर मिळालं. त्याचं भाडं १४० डॉलर होतं–म्हणजे माझ्या पगाराच्या मानानें भरमसाटच. पण त्याची बांधणी चांगली होती. दोन खोल्या, स्वैंपाकघर, संडास-न्हाणीघर, एक प्रचंड हॉल–शेकोटीसाठीं बांधीव जागा असलेला, खालीं दोन तळघरी खोल्या, बाहेर एक नोकरांचं घर, एक गॅरेज-सारखी शेड् आणि मोठ्ठी बाग. गांवाबाहेरच्या एका उपनगरांत, स्तेफानोस नांवाच्या चर्चजवळ आणि "आफ्रिका हॉल" ह्या सुप्रसिद्ध इमारतीजवळ. जागा पुष्कळ होती आणि घरांत दोन पेटचा, एक मोठा पलंग, एक बाळाचा पलंग, दोन खुर्च्या, एक टेबल, थोडी ॲल्युमिनियमची भांडी, एक विजेची शेगडी आणि एक घासलेटाचा स्टव्ह एवढंच सामान होतं. आणि पुस्तकं.

मी ठाकूरला आणि मल्याला सुट्टींत राहायला बोलावलं.

एक दिवस सकाळीं गंजलेल्या रंगाची एक फोक्सवॅगन् मोटार माझ्या दारांत उभी राहिली आणि दोन इंग्लिश पोरांबरोबर ठाकूर खालीं उतरला.

ह्या दोघांनाहि मी कुठेतरी पाह्यलं होतं. फाड्कन् आठवलं: तो बुटका, नर्व्हसपणें हसणारा,–तो टॉम्.....व्लूर–ग्रॅहॅमच्या बायकोचा नवा नवरा. त्याला मी एकदां भेटलों होतो–ग्रॅहॅमनेंच मला त्यांच्या घरीं नेलं होतं. पण ह्या दुसऱ्याला कुठे पाह्यलंय्?–विजू हॉस्पिटलांत असतांना–डॉमिनिकच्या घराजवळ–विस्तोरान्ते...बार...पात्तीसेरी....काय त्या इतालियनाचं नांव... एन्रिको–हं, एन्रिकोच्या दुकानांत–बियर पितांना–हाच तो–जिंजर रंगाची दाढी, मानेवर सहा सहा इंच केस–ऑलिव्ह ग्रीन जॅकेट्, अर्धी चड्डी, पाठीवर पिशवी न् बिस्तरा, उंच गालफडं, कष्टाळू हनुवटी, सीधं पण जरा उंच नाक, –हाच...जर्मन् ?

मग कळलं हा जॉर्ज : जॉर्ज स्माईथ्.

टॉम्ची माझी एकदांच अगोदर भेट झालेली. पण असेल्ला बघावं असं त्याच्या मनांत आलं, जॉर्ज युरोपांतून मजल दरमजल करत टॉमकडे आला होता–कॉलेजांतले मित्र–, थेट असेल्लाला माझ्या घरीं राहतां येईल असा विचार करून हे गेले, ठाकूर भेटला, "माझ्याकडे रहा, मी दिलीपचा मित्रच" म्हणाला, राह्यले. तिथें मल्यहि भेटला. आतां ठाकूरला पोचवायला माझ्याकडे आले.

घरांत विजू आजारी होती. चहाला दूध नव्हतं, गडी कधींचा घासलेट आणि दूध घ्यायला गेला होता त्याचा पत्ता नव्हता. पण अर्धी वाटली व्हिस्की कधींची पडून होती. आम्ही फर्निचरविहीन दिवाणखान्यांत तक्तपोशीवर बसून व्हिस्की पीत गप्पा मारल्या. अकराच्या सुमाराला, बाहेर कडक उन्ह असतांना.

मग मी अचानक जॉर्जला म्हणालों, "तुला माझ्याकडे राह्यचं असेल तर राहा. जागा पुष्कळ आहे."

जॉर्ज राह्यला, ठाकूर राह्यला. टॉम् म्हणाला, "उद्यां मेरिएलला आणि मुलींना घेऊन येईन दुपारीं."

तो गेला आणि आम्ही आमचं रोजचं जेवण–पाव आणि भांडंमर सूप–एकत्र जेवलो.

दोन चार दिवसांत खांद्यावर पिशवी घेऊन आपल्या नेहमींच्या झोंकांडत्या चालींत मल्य येऊन हजर झाला.

दिवाणखान्यांत हे तिघे झोंपत. बाकीच्या दोन खोल्या आम्ही वापरत होतो. विजू आता थोडीशी हिंडायफिरायला लागली होती. पण बाळाचं करण्यांत तिचा दिवस जायचा.

मी आणि मल्य स्वैंपाक करायचो. जॉर्ज आणि ठाकूरकडे पाव आणण्याचं काम होतं.

सकाळीं बागेंत जॉर्ज इतालियन भाषेचा अभ्यास करायचा. ठाकूर व्हरांड्यांत बसून "इंग्रजी निबंध कसे लिहावेत ?" ह्या विषयांवरचं गाईड लिहीत असायचा. मल्य "न्यू स्टेटसमन्"चे अंक वाचत किंवा पुस्तकं वाचत बसायचा. मी आणि विजू बाळाबरोबर आमच्याच खोलींत असायचों.

आठाला विजू चहा करायची. माझ्या किंवा ठाकूरच्या ट्रान्झिस्टर रेडिओवर बी. बी. सी.वरल्या बातम्या ऐकत आम्ही चहा घ्यायचों.

भोंवतालीं युकॅलिप्टसच्या झाडांतून उन्हं पसरत असायची.

मग मी आणि मल्य स्वैंपाकघरांत गोंधळ करत असूं. विजू वारंवार आत येऊन कायदा हातांत घेण्याचा प्रयत्न करायची पण भात कितपत शिजवावा हेंहि ठरवण्याचं स्वातंत्र्य तिला मिळूं दिलं जात नव्हतं. सहा कप टोमॅटो सूपमध्यें एकदां मी आणि मल्यनी अठरा चमचे मिरचीची पूड घातली. ठाकूर शिव्या देत उठला आणि म्हणाला–"ह्यापेक्षां सालं उपाशी मेलेलं काय वाईट ?" जॉर्ज म्हणाला, "ह्या स्फोटक भाज्या, ह्या आमट्या, ही कालवणं..." मल्य म्हणाला, "इतकं कांहीं वाईट नाहीं. मिसेस् चित्रे, हे कांहीं अगदींच टाकाऊ आहे कां ?"

"मीच उद्यांपासून स्वैंपाक करायला लागते परत. मला आतां बरं वाटतंय्. आणि जास्त बरं वाटायला निदान पोटांत कांहींतरी जायला हवं..." विजू म्हणाली.

"ठाकूर, तुला पाह्यजे तर तूं ह्याच्यापेक्षां चांगलं जेवण करून दाखव." मी म्हणालो.

**[ मे महिन्यांत सुरूं झालेलें हें प्रवासवर्णन (कांहींच्या मतें आणखीन कांहीं) या अंकीं समाप्त होत आहे. वाचकांनीं आपल्या प्रामाणिक प्रतिक्रिया (पण थोडक्यांत) कळवाव्या. त्यांना (यथास्थल) प्रसिद्धी दिली जाईल. —संपादक**

"आजच रात्रीं करतो" तो म्हणाला, "राजपुतांनी आजवर स्वत: स्वैंपाक केल्याचं कोणी ऐकलंय्. पण हे ब्राह्मण–" तो मल्यकडे बोट करून म्हणाला, "with their falling standards!'. त्यादिवशीं संध्याकाळीं गुपचुप ठाकूर बाहेर जेवून आला आणि नंतर केवळ सूडाच्या भावनेनें त्यानें बटाटयाची भाजी केली. ती करपलेली. "we're all condemend to choose : between uncooked rice and charred potatoes, between edible explosives and starvation."
जॉर्ज म्हणाला.

त्या दिवसापासून आम्हाला कोणालाच स्वैंपाकघरांत प्रवेश मिळाला नाहीं.

दरम्यान एक अपघात झाला, त्याचं राह्यलंच.

असेल्याला पगाराची बाकी घ्यायला मला जायचं होतं. एरिक् नावांच्या एका मित्राला मी पेट्रोलचे पैसे द्यायचे कबूल केलं होतं. तो, ठाकूर, मी, विजू आणि दोन महिन्यांचंच बाळ असे असेल्याला जायला निघालो.

मधे नाझरेथ नांवाच्या गांवीं थांबलो. तिथें एका ओळखीच्या कुटुंबांत विजूला आणि बाळाला ठेवलं. पॉल नांवाचा आणखी एक जण बरोबर घेतला आणि निघालो.

ताशीं १२० किलोमीटर वेगानें जाणारी गाडी एका कड्यापासून दहा मीटर अंतरावरच उपडी झाली. तिनें तीन कोलांटया खाल्ल्या आणि तिच्या टपाचा चक्काचूर झाला.

काचांच्या कचकोळांतून मीच प्रथम बाहेर पडलों. नंतर बाकीचे.

पॉलची सिगरेट मी पेटवणार इतक्यांत गाडी उलटली होती.

तो बाहेर पडला. सिगरेट त्याच्या मुठींत घट्ट होती. ती अभावितपणें त्यानें ओठांशी नेली. आणि मग काय झालं हें कळून तो मटकन् खाली बसला.

आम्ही गाडी उभी केली. इंजिन चालूं होतं. परत नाझरेथला गेलों. ताशीं पांच किलोमीटर वेगानें.

त्या रात्रीं मी, विजू आणि बाळ एका हॉटेलांत राह्यलों. थोडं चिंतन केलं. . . .

अधून मधून दुपारीं टॉम् आणि मेरिअल येत.
त्तजच्या पांचसहा बाटल्या किंवा बिअर घेऊन.
नंतर आम्हीं सगळे पीत, गप्पा मारत बसायचों.
कधीं कधीं रात्रहि व्हायची.






एकदां व्हरांड्यांतल्या झुडुपाच्या पानावर वाढवलेलं हौसेचं नख रुतवत मेरिअन मला म्हणाली, " You have very strange, unquiet, unsettling beautiful eyes !" तेव्हांहि आम्हीं त्तजच प्यायलों होतो.

एकदां पुरते कपडे केलेला मी बूट मोजांसकट तरं उपडा पडलो आणि विजूनें मला कपडे वदलून कसावसा उचलून झोंपवला तेव्हांहि त्तजच प्यायलो होतो.

एकदां रात्रीं अकराला मी बी. बी. सी.वर एडिंबरो फेस्टिव्हल-मधलं टिप्पेट्चं नवं संगीत ऐकत होतो नंतर जॉर्ज आला आणि आम्हीं दोघेहि शांततेमुळें बेचैन झालो तेव्हांहि त्तजच प्यायलो होतो.

सप्टेंबरमध्यें नवं वर्ष सुरू होतं, "मस्कलचा" उत्सव होतो. "मस्कल" म्हणजे क्रूस. ख्रिस्ताच्या मूळ क्रूसाचा एक तुकडा इथिओपियन राजांनी इथिओपियांत आणला अशी एक दंतकथा आहे. मूळ क्रूस सांपडल्याचा, नव्या वर्षाचा हा पहिला दिवस. आदिस-अबाबां-तल्या पहिल्या मस्कलच्या रात्रीं जशीं त्तज प्यायलो तशी कधींच प्यायलेलो नाहीं.

खरं म्हणजे घरीं त्तज आणून प्यायचं ठरलं होतं. गांवठी त्तजचा एक गुत्ता माझ्या घरापासून साधारण पाव मैल अंतरावर होता. पिशवींत बाटल्या घेऊन मी, जॉर्ज आणि टॉम् त्तज आणायला गेलो.

पण गुत्त्यांत शिरल्यावर थोडी त्तज आत्तांच इथेंच प्यावी असं वाटलं.

मला अम्हारिक जेमतेमच येत होतं. टॉमला थोडीशी गाल्ला बोली येत होती. जॉर्जला कोणतीच लोकभाषा येत नव्हती. आम्हीं आंत शिरलो, बाकड्यावर बसलो. बाजूला त्तजची लाकडी पिपं, बूट पॉलिश् करणारी मुलं, मजूरी करणारे लोक, नियमित दारुडे . . . कोणी तरी आम्हांला फुकट त्तज पाजली. मग आम्हीं त्यांना. असं सत्रच सुरू झालं. फरंजीपणा वितळला.

येतील त्या सर्व भाषांमध्यें आम्हीं you have very strange, unguiet, unsettling beautiful eyes ! " उच्चारत हलकल्लोळ माजवला.

मग दोन तासांनीं घरीं जायची आठवण होऊन आम्हीं धडपडत उठलो.

रस्त्यांतून घोगऱ्या आवाजांत गाणीं गात गात आम्हीं जेमतेम "गिऑन" हॉटेलाजवळ आलो. हें उच्चभ्रू श्रीमंतांचं हॉटेल. टॉमच्या मनांत काय आलं कोण जाणे.

"आपण 'गिऑन'च्या लाऊंजमध्यें जाऊन बिअर पिणार" तो ओरडला.

ह्या दोघांच्या पांढऱ्या कातडीमुळें गिऑनच्या दरवानाचाही नाइ-लाज झाला.

आम्हीं गिऑनच्या बारमध्यें शिरलो.

आम्हीं आंत शिरतांच पंधरावीस नजरा आम्हांला टोचल्या. आम्हीं








त्या पुण्यशील दिव्यांच्या मऊ साजुक प्रकाशांत पायांखालच्या लखपती लाल रुजाम्यावर, ऐषारामी फर्निचरच्या आणि श्रीमंत लोकांच्या गराड्यांत जास्तच विदुषकी, मळकट, असंमत, विषम दिसत असूं. हें आम्हांला, आमच्या तर्‍हे आनंदाला झोंबलं.

टॉम्नी बिअर मागवली.

त्तजवर बिअर भलतीच चढते.

एक अमेरिकन–बहुतेक तज्ज्ञ असावा– Nuclear physics वरचं पुस्तक वाचत होता. त्या पुस्तकाचं नांव वाचून टॉम् जोरांत म्हणाला, "हे ××× अमेरिकन्स्–जगभर बॉम्स् टाकतील आणि शांतीचं साम्राज्य पसरतील."

त्याला भांडण उकरायचं होतं.

अमेरिकनानें एक तीक्ष्ण दृष्टिक्षेप टाकला आणि मग तो लांबच्या खुर्चीवर जाऊन बसला.

समोर एक पुरुष आणि एक बाई बसले होते. त्या बाईनें एक गुड्घा खुर्चीवर मुडपला होता.

"आय्ला, तें बघ!" टॉम् तिकडे बोट करून म्हणाला, "तें काय दिसतंय्."

ती दोघं उठून गेली. पुरुष वेटरजवळ जाऊन रागानें कांहींतरी पुटपुटला.

वेटर आमच्याकडे आला आणि नरम पण उद्धट आवाजांत म्हणाला, "आणखी कांहीं आणूं?"
"Yes, please! Some more beer!" जॉर्ज म्हणाला.
"Sorry sir, beer's finished!" वेटर म्हणाला.
"What?" जॉर्ज म्हणाला, "Did we drink so much?"

वेटरने खांदे उडवले, "Anything else?"
"Where's your pisshouse?" टॉमनें विचारलं.

वेटरला कळलं नाहीं.
"Toilet, toilet!" मी म्हणालो.

"Gents" जॉर्ज म्हणाला.
"Ladies' will do as well, in fact I prefer—" टॉम म्हणाला.
"That way, sir!" वेटरनें हात उंचावून डावीकडे फिरवला.

मग जॉर्ज आणि टॉम् अदृश्य झाले. मी एकटाच तिथें बसलो. हातांतल्या पिशवींत गांवठी त्तजच्या सहासात वाटल्या. बारमध्यें मंद आवाजांत Coll jazz, आणि पंधरावीस गरम नजरा.

एक तास झाला. बारमधली गर्दी वाढली. उंची सूटस्, अलंकारांनी मढवलेल्या बायका.

मी उठलों आणि बाथरूम शोधली. कोणीच सांपडलं नाहीं.

मग मी घरीं आलों. ठाकूर आणि मल्यला तिथें दवडलं.

पंधराच मिनिटांत ह्या दोघांसकट ते परतले. टॉम् जमिनीवर कोसळून ताठ पडला. त्याच्या हातांत टॉयलेट पेपरची एक गुंडाळी होती आणि त्याच्या प्रत्येक खिशांत "Ghion Hotel"च नांव भरलेला नॅप्किन् होता.

"He wanted to rob the Capitalists" जॉर्ज म्हणाला, "Fantastic! Fantastic!"

मग टॉम्च्याच गाडींतून जॉर्ज त्याला त्याच्या घरीं घेऊन गेला.

मी झोंपी गेलो तो दुसर्‍या दिवशीच्या मध्यान्हापर्यंत, गाढ. टॉम्सुद्धां दोन होते.

दुसरा टॉम् भारतीय मल्याळी ख्रिश्चन होता.

हा माहिती आणि रेडिओ खात्यांत काम करायचा. बहुधा रोज दुपारीं यायचा. गांवभरच्या बातम्या आणि देशांतली परिस्थिति यांबद्दल भाष्य करायचा आणि आपल्या निळ्या ओपेलमधून स्वतः-वरच खूष होऊन निघून जायचा. त्याच्याबरोबर त्याचे माहिती-खात्यांतले इथिओपियन मित्रहि कधीं कधीं यायचे.

हळूं हळू आमचा परिवार वाढत गेला.

मग शाळा चालूं झाली. मला क्वार्टर्स मिळाले. मी शाळेच्या कॉंपा-ऊंडांत राहायला गेलो.

मग एकदां मी पार्टी दिली.

ठाकूरचीहि बदली झाली होती, तो गांवाबाहेरच्या एका बोर्डिंग स्कूलमध्यें होता. त्यालाहि मी पार्टीला बोलावलं.

पार्टी मी आणि ह्या दुसर्‍या टॉम्नें मिळून दिली. रात्रीं ठाकूर पार्टीला आला तो एका धंदेवाईक बाईबरोबर.

ह्यावरून त्याचं आणि टॉम्चं फाटलं. माझ्या वतीनें टॉम्नें खोटंच

बंडोपंत, कमाल आहे बुवा तुमच्या धाडसीपणाची ... या ऑपरेशनमधून तुम्ही पडलांत....

ठाकूरला सांगितलं कीं, ह्या बाईला तावडतोब घेऊन चालता हो, यायचं तर एकटा ये.

"ती माझ्याबरोबर आलेय्, ती माझी मैत्रिण आहे, मी जाणार नाहीं. दिलीप असं म्हणणंच शक्य नाहीं. तूं कोण ?" ठाकूर टॉम्‌ला म्हणाला.

मला ह्यांतलं कांहींच ठाऊक नव्हतं.

ठाकूर म्हणाला, "माझी रात्रीं इथेंच राह्यची सोय कर."

"रहा," मी म्हणालों, "भरपूर जागा आहे !"

पण तासाभरानें ठाकूर संतापून जायला निघाला. "मैं निकल रहा !" तो म्हणाला "क्यौं ?" मी म्हटलं, "और इतने परेशान क्यौं नज़र आते हो, किसी बातपे गुस्सा तो नहीं आया ?"
"छोड़ो यार, और कभी बोलेंगे, हम चल दिये !"
"तुम्हारी मर्ज़ी" मी म्हणालों, "good night !" इतक्यांत संतापलेल्या जॉर्जनें आणि (इंग्रजी) टॉमनें मला खरी हकीकत सांगितली. ते ठाकूरला पोचवणार होते, मी त्याला काढून लावलं असलं तर !

"अच्छरसिंग !" मी ओरडलो, "सच बात बताये बिना मत जाओ, वरना......"

"यार जाने दे मुझे" ठाकूर म्हणाला, "वरना उस टॉम्‌के बच्चेको मार दूंगा."

तो तडक आपल्या बाईसकट गडप झाला. भारतीय टॉम्‌हि अदृश्य झाला होता. पार्टी अचानक बंद पडली.

उरली बुचं आणि बाटल्या.

सभ्यता !

लिहितां लिहितां हस्ताक्षर धांवरं व्हावं, भाषा सर्वत्र नुसती फैलावत जावी, घटना आणि प्रसंगांची मुळं भूगर्भभर विस्तारत जावीत, आतांपर्यंत नेटक्या मोजमापांत आलेले शब्द भराभरा जन्म खोलत जावेत.

स्वाभाविक होण्यासाठीं मी धडपडतोय्.

कुठेंतरी चरित्राचं मूळ एकदांच रोवलं जातं त्यावेळीं शरीरमनाच्या सगळ्या प्रक्रिया नैसर्गिक होतात. आतां पुढें तो क्षण येईल, हा आला, हा आला, हा आला, म्हणतां म्हणतां वर्षानुवर्षं अस्तित्वाचं अग्र जीवघेणं होतं तरी गुंगारा देत नाहींसं होतं. मी लिहितोय् आत्मचरित्र, प्रवासवर्णन नव्हें. तरी लिहिला जातोय् फक्त ढोबळ ढाचा. त्या त्या क्षणीं जें झालं त्याचं स्वरूप उघडत नाहीं फक्त त्यावर पेनचे अपेशी ओरखडे उठतात आस्तित्वाचा उभा आक्रोश साक्षर होत नाहीं, जाणिवेचं जोखड मानेवर भयंकर होत जातं.

मी कोण, आजवर काय झालं, कां झालं, त्याचा अर्थ काय ?

आणि एक दिवस नामरूपाच्या पाकळ्या गळून पडतात. चेहऱ्यावर उन्हं घट्ट होतात. मध्यरात्रींचा हुरूप आणि माध्यान्हाचा ऐवज ठिक्कर पडतो. पेन गोठतं, बोटं स्थिरावतात. एक शुभ्र उष्णता कपाळीं चढते, अंगांग दगावतं, प्रतिस्पर्धी इंद्रियांच्या खणखणाटांतून 'दिन् दिन्' आवाज ऐकूं येतो स्मृतींच्या टांपा उठतात.

अजून हें गद्य धुमसतंय् तरी त्यांची राळ भडकत नाहीं. मी अजूनहि झोपेंतच चालतोय्.

माझं सगळं आयुष्य झोपेंतल्या झोपेंत गेलंय्. मी आदिमानवासारखा अजूनहि अवाक् आहे. ह्या शिकलेल्या भाषांची आच्छादनं, ही कांति आणि कातडी, ह्या कविता, ही माणसं, ही लेबलं, ह्या जाहिराती, ही जहरं, ही शहरं, हे शहारे, हे जाड हार, हे जड-जवाहीर, ह्या आपत्ती, ही परचक्रं, हे सूर्यास्त, हे देशविदेश, ही अन्नं, दारू, भांग चरस, मेथिड्रिन, अध्यात्मं, धर्म, शास्त्रं, ब्रश, आईलपेंटचे थर, गाण्यांची विलयनं, भूस्तरं अस्तित्वाची, अस्तरं जिवंततेची, ही दृश्यादृश्यांची अभ्रकं, कोळसे, डांबर, लोखंड, स्त्रिया, खाणारी अजस्त्र झोपभट्टी, त्या हिरव्या प्रकाशांत उडणारी लिप्स्टिकांची फुलपाखरं, कोवळ्या सूर्यप्रकाशांत अचानक म्हातारणारं, स्पर्शविश्व ती लौंगटं, ते लखलखाट, कडकडाट, सिंहाच्या मुताचा उग्र वास, शतशतकांच्या रणांगणांतली संस्कृतींची लीद, काडीकचऱ्याच्याच होतील कितीक कहाण्या. . . .

मी मी म्हणताना काळोखून जातो सगळा परमार्थ.

मी ह्या आयुष्यांत तीनचारदांच जागा झालोय्. आणि त्याच वेळीं ह्या प्रचंड शांत चक्रगतींत भम्म् भम्म् विरलेत माझ्या शब्दांचे दाते.....

पुन्हा पुन्हा त्याच पूर्वलिखित धमन्यांमधून अर्थांची अभिसरणं होतात अडथळेच फक्त ओळखीचे. माझ्या छातींत प्रेम भरून येतं. सुरक्षितता नष्ट होते. मी पूर्वीकडे जातो आणि पश्चिमेकडे परत येतो. मी उत्तरेकडे जातो, दक्षिणेंत पसरतो, माझ्या आकांक्षा वायव्य होतात, मी आग्नेयेस भडकतो, नैऋत्येची नक्षत्रं नखशिखांत, ईशान्येंत विरून जाणारं शुभ्र कबूतर....आणि अधोगामी मुळं, उर्ध्वगामी फांद्या, पापपुण्यांचे पल्लवते पल्ले, रक्तांतला दारूण ज्योतिविलास, भरगच्च भरधांव स्वांतःसुखाय एकस्वी एककल्ली वेग, आस्तित्वाचा निर्यमक संधिप्रकाश.....ह्याचा उठाव कसा होतो आणि ह्या चिल्लरीचा उपयोग काय ?

आयुष्यभर मी सहज साधं कसं व्हावं हे शोधतोय्. पण होतोय् अधिकाधिक क्लिष्ट. आतां कष्ट होतात.

माझा स्वभाव हेंच माझं विधिलिखित. तोच मी शोधतोय् सगळ्या रूपांचं दळण दळत पिठूळ एकतानतेंत आणि आंतडयांतल्या घरघराटांत.

वयाच्या एकविसाव्या वर्षीं मी लग्न केलं आणि त्याच वर्षीं मी इथिओपियाला गेलो. पंचवीस भरत आली तेव्हां परत इथेंच आलो.

मी लिहितो, सांगतो, उच्चारतो हें माझं वैशिष्ट्य नव्हे. मुंबईत होतो तेव्हां मॅट्रिकनंतरची पांच वर्षं शिकण्यांत आणि शहरभर भटकण्यांत घालवली. तेव्हांच हा स्वभावाचा शोध सुरू झाला, ही दंतकथा लिहूं लागलो, हें चरित्र पानन् पान् उलगडूं लागलो.

तेव्हां मन चिव आंधळं होतं, नजर अंधुक होती, एका जागीं अस्वस्थ वाटायचं. तेव्हां चालण्याचा शोध लागला. रस्ते तळपायांखालून गेले. घाणेरडी हॉटेलं, वकाल वस्त्या, रेडिओग्रॅमवरची घोगरी फिल्म गाणीं, सिगरेटी, चहा, पाव, खिमा भंकस, वोलणीं, गांवठी दारू, ओकाऱ्या, भांग, चरस, तंबाखू, सिनेमे, दुःख, प्रेम, वेकारी, उपास, फलाट, फूटपाथ ह्यांचा शोध सुरू झाला. पुस्तकं वाचलीं. "क्राईम् अँड पनिशमेंट्" वाचून अनेक आठवडे कासावीस हिंडलो. "विमेन् इन् लव्ह" वाचलं, "कासल्" आणि "ट्रायल" वाचलं, फ्रॉईड ाचला, नीत्शे वाचला, कर्केगार्ड वाचला, त्रे वाचला, तुकारामाची गाथा वाचायला सुरुवात केली, रँबो वाचला, हार्ट क्रेन वाचला, उपनिषदं वाचली, युनिव्हर्सिटीच्या लायब्ररींत आठ आठ तास बसलो, हस्तसामुद्रिकांचा अभ्यास केला, विट्गेन्स्टाईन् वाचला, हजारों पुस्तकं वाचली आणि ती वरगडयांत दडपून रस्ते चालत राह्यलो. स्त्रीसुखं आणि एकान्त धुंडाळले, तासन् तास दादरच्या स्मशानांत बसलो किंवा समुद्रकांठावर झोपून राह्यलो, दोन चार मित्र जोडले, शेकडों ओळखी केल्या. नोकऱ्या केल्या. पदवी मिळवली. तरी सगळ्या गोष्टींत-सांपडावं ते सतत अव्याहत उपलब्ध झालंच नाहीं.

ह्यांतूनच मनावर लाख पापुद्रे, लाख आच्छादनं जमली, संवयी जडल्या, अर्थांचे सांचे बनले, तोंडावर मुखवटा जमा झाला, लेबलं जमली, मथळ्यांचे संग्रह जमले, सही करायला शिकलो, जगणं रांधलं बरबाद बरबटलेल्या हातांनीं.

चाललो, चाललो, चालतोयच अजून ह्या समव्यस्तांतून आणि दैवी गल्लीबोळांमधून.

मग मन निर्णायक, तुसडं, अलिप्त झालं. अस्तित्वाचा कुठं एखादाच तंतू मिळाला, एखाद्याच क्षणीं फक्त जन्म उत्सवी झाला, तळपाय-चपलेचा संबंध ओळखूं आला. मग फक्त नाकारत गेलो अर्थांचे अतिरेक, शब्दांचं आधिक्य, तफावतींतून दिसणारे रस्ते, हें झालं विन्कनेक्शनी जग. ह्या परिभाषा, हे शब्दकोश, ही विज्ञानं, तत्वज्ञानं, अध्यात्म, धर्म, हे परमार्थ, विल्डिंग आणि शिवलिंगं, कुटुंब आणि सेल्फ् कण्टेण्ड् ब्लॉक्स्, न्हात्याधुत्या मुली, मुली, मवाली, कवि, हीरो, हिरॉईन, पुढारी, गांधी, नेहरू, विवेकानंद, आईन्- स्टाईन ज्ञानदेव, महायुद्धं, परमाणू, पेशी, खगोल, लिप्टन्, ब्रुकबाँड्, डालडा, वैष्णवधर्म, शाक्त पंथ, तंदूरी चिकन्, पानग्या, रगडा, दोस्तोयेव्हस्की, रँबो, हेन्रि मिलर, लॉरेन्स्, काफ्का, Fear and Trembling, Philosophical Investigations, Thus spoke Zarathustra, दुईनो विलापिका, ऑर्फियस-सुनीतं, Do not go gentle Into That Good Night, And yet this great Wink of Eternity, ली पो, कन्फ्यूश्यस्, कडकडाट, लखलखाट, बाख्, बेटोव्हन, रहिमतखाँ, पांडुरंग, सोटा छाप गजकर्ण मलम, कॅमल इंक आणि












स्कॉलर एक्सरसाईज् बुकं, पॉल क्ली, जॅक्सन् पोलॉक्, कार्व्हुझ्ये, वात्स्यायन, अनंगरंग ताहिती, अॅझटेक् लोकांची दैवतं, अॅंडीझ् कॉर्दिलेरा, बायझांटियम्, वेस्ट लॅंड, किंग लियर, टेंम्पेस्ट, अरबी भाषेंतल्या सुरस आणि चमत्कारिक कथा, मंगोलियाचं पठार, ल्हासांतला दलाई लामाचा पाटोला राजवाडा, मार्लन् ब्रॅंडो, जेम्स् डीन्, मार्लिन् मॉन्रो, एलिया कझान्, मॉंटगॉमरी क्लिफ्ट, अवलोकितेश्वराचं स्मित, मन्याचे डोळे, वंडू वझेचं केंडसर विलीन हास्य, अरुणच्या ओठी, रमेश अनवाणी चालतोय्, अशोक शहाणेला आत्महत्त्याहि अशक्य झालेय्, अनोळखी मुली माझ्याकडे बघून हंसतात, रांडेकडे जावंसं वाटतं, तुकाराम कीर्तन करतां करतां अंतर्धान पावतो, दर्गा, सब्जा, मिठाई, इस्पिकचा हात, तिरिमिरी, कढया, शेगड्या, तंगड्या, मांड्या, घाम, केस, केमिस्ट, खमीस, खिसमिस, ख्रिसमस, खसखस, दुभंग दर्यातलं अभंग कबरस्थान, इजिप्शियन मृतांचं सप्तक पापाणाचे घोडे, स्वर्गीय सप्तक, दांते आणि व्हर्जिल निराळ्या भागांत गेलेले, रात्रींची तुळा, अक्षरन् अक्षर कर्णाची मांडी पोखरणारा भुंगा, महारोग आणि संभोग, डोळयाचं पातं लवतं न लवतं तों जगभर चमकून दिसेनासा होणारा माझा आख्खा जन्म, एक श्वास... विजूचे डोळे, विजु खळे भोविन्नले गे माये आणि हंसणं, नागडा उन्हाळा पाठीचा पन्हाळा आणि रायगडचे राजे सुरत लुटणारे आणि डसी हुस्ने बेनामको चाहता हूँ क्यौं कि रंगीन हो ये कलाम मेरा, Seeing is creation, चालणं, चालणं, चालणं. तर्र झालेली मार्गारिट मला म्हणाली, " You are just a savage bastard" मी म्हणालो,

" Yes I'm just a savage bastard, I am nude, I am nude in a million-skinned onion-skinned world, and I starve, I eat my father's flesh and suck my mother's bones, yes I'm carnivorous and omnivorous and I'm a sleepless somnambulist, yet I love with all my hard white teeth and my mostrous guts, I fornicate existence, I walk under cities and stars, I get drunk and I vomit aching ecstacies, I smell of piss and semen and urine, I grow tall and laugh a garagantuan laughter I mine my soul in a typewriter and I walk my legs out and talk my teech out and go mad mad mad in the mania of creation I'm just a savage bastard . . .

म्हणून मीं जिल्चा मुका घेतला, मेरिएलला सरळ विचारलं. " May I make love to you, if you dare ? " जोनच्या कुशींत तोंड खुपसलं आणि तरी पुन्हा सगळं सोडून चाललों, चाललों, चाललों. संध्याकाळीं धुक्यांतून आणि गारठ्यांतून ओव्हरकोटच्या खिशांत हात खुपसून मी निवांत डांबरी शांततेतून चालत जायचो. कधीं कधीं आशय कडेवर असायचा. कधीं कधीं विजू बरोबर असायची. मग खूप चालल्यावर आम्हीं टॅक्सींत बसून पिआझ्झांत जायचो. पिआझ्झांतले दिवे, तिथल्या झगमगत्या जाहिराती, दुकानं, बार—सगळं आशय एकटक बघत राहायचा. मग बाजार करून आम्ही घरीं परतायचो. घरीं आल्यावर मी तासन् तास् रेडिओ ऐकत बसायचो.

मग लिहायला, अपभ्रंश करायला, सुरुवात केली. एक कादंबरीहि लिहून काढली.

रोज आठ ते दहा तास लिहीत असायचो. फ्रेंच शिकण्याचा प्रयत्न केला.

इतरांच्या कवितांचे अपभ्रंश करतांना त्यांचं सगळं व्यक्तित्व अंगवळणी घ्यावं लागतं. आणि आपल्या अस्तित्वाशीं त्याचा एकात्म सजीव संबंध ओळखावा लागतो. स्वतःचं लिहिण्याइतकंच हें सगळे प्रयास शोषून घेणारं काम आहे.

एकदां कोणाचंहि काम स्वतःच्या अंगीं घेऊन पुन्हां बाहेर टाकतां आलं कीं त्याचं नवल उरत नाहीं. पण असं करतांना कष्ट होतात.

सहा महिने असे गेले. मग अपभ्रंश करतांना सुचलेले विचार 'कीर्तनं' म्हणून लिहून काढले आणि पुन्हां एकदां वाचून, तुटके भाग सांधून, कादंबरी आणि ही कीर्तनं पोस्टांत टाकून प्रकाशकांकडे रवाना केली. अचानक, महिनाभर स्वतःच्या कविता लिहिल्या. पूर्वीचं कांहींच त्यांत उरलं नव्हतं, फक्त शब्दांवर थोडीफार हुकुमत आली होती, वेग घट्ट धरून ठेवतां येत होता, नव्या, तुटक लयी कळून येत होत्या, जुन्या संवयी नष्ट झाल्या होत्या.

रात्रीं आमच्या घराजवळच्या मैदानाजवळून जातांना वर चंद्र आणि खालीं धुक्यांत अन् चांदण्यांत एक खेचर नेहमींच चरतांना दिसायचं. माझी इथिओपियांतलीं तीन वर्षं संपत आली होती.

पार्ट्या संपल्या, भाषा शिकवण्यांतला उत्साह संपला, नव्या ठिकाणची नवलाई संपलं, कर्ज संपत आली, दुःखं, आठवणी, आनंद, भविष्यं—सगळं संपलं.

एकदां खुर्चीवर असाच बसलो होतो आणि एक वाक्य स्पष्ट ऐकूं आलं. "Property is a vice, travel." शिल्लक, बचत कांहीं नव्हती. वाटत होतं आतां युरोपांत जावं. कां, कशासाठीं, कोण जाणे पण आतां सुरक्षित पगारी आयुष्य नको.

जो काय प्रवासखर्च, मिळेल तो घेऊन मार्सेय्चं तिकिट काढावं, तिथून पॅरीसला किंवा लंडनला जावं. परदेशांतला अज्ञातवासच बरा जन्मभर. एकेक देशाचा त्याग करत जावं.

तें झालं नाहीं. स्वभावच विनभरंवशाचा, क्षणांत पालटणारा, कधींच निर्णय न घेणारा.

शेवटीं गाशा गुंडाळला तोहि आणखी तीन वर्षांचं कंत्राट गळयांत बांधून, पुढें पुन्हां परतूं शकलो नाहीं तो नाहींच, फक्त कर्ज वाढली आणि परतल्यावर पैशासाठीं पुन्हां आयुष्यांतले सगळे उद्देश गाडावे लागले. पुन्हां हातांत पेन धरावं लागलं. इतर अवजारं चालवतां येत नाहींत म्हणूनच केवळ.

●●●







अनुक्रमणिका

पंचविसाव्या वर्षी, मुंबईत परतलो तेव्हां शिल्लक होतं आतड्यांतलं अजून न पचलेलं अन्न, आठवणी, प्रेरणा उद्देश. आणि पुन्हां परत जायचा तर प्रयत्न केला. तो फळला नाहीं. कर्ज वाढलीं, कष्ट वाढले, मनस्ताप वाढले. तीन वर्षांनीं मुंबईत परतलो, तेव्हां पहिल्यांदा जाणवली इथली गर्दी, इथला घाम, इथला उकाडा. ह्या पंचवीसेक वर्षांत जगलों म्हणजे काय केलं हें सरळपणें लिहितां आलं. पण तो सरळपणा मूळ जगण्यांत नव्हता.

मूळ जगणं आंधळं, बेभान अजस्र भूगर्भ होतं. त्याला फक्त जिवंतपणा होता, स्वत्व होतं; त्यांत संघर्ष होता आणि शांति होती.

सरळपणें लिहिण्यांत फक्त संस्कार परतवले गेले. पण संस्कार परतले तरी हजारोंनीं माखून ठेवलेली लक्तरं शब्दाशब्दांवर लोंबत राहिली.

लिहिणं म्हणजे संस्कृतीच्या आरशांत न्याहाळणं. पण ह्या आरशांत फक्त आत्मविडंबन दिसतं, रोगराई दिसते, ऱ्हास दिसतो. स्वतःला स्वतः जाणवणं हें लिहिण्यापेक्षां अधिक साक्षात् आहे.

हाच शब्द : साक्षात् मी शोधतोय्.

मी वास्तव नाकारलं नाहीं. मी स्वतःला नाकारलं नाहीं. मी मन बाजूला ठेवलं नाहीं. मी वस्तूहि रोखल्या नाहींत. जगणं म्हणजे विश्वघटनेंत रांधलं जाणं. जर बाहेरल्या गोष्टी बाहेरच राहिल्या तर आंतली स्फुरणंहि शांत होतील. बाहेरल्या चेतना निवळल्या तर आंतले उद्देशहि मावळतील. मनाचा आणि विश्ववास्तवाचा उठावच मुळांत परस्पर आहे : परस्परांना पूरक. मी फक्त माध्यम शोधतोय्: अस्तित्वाचं निव्वळ माध्यम. फक्त दोन टोकं दिसतात : अंतर्मुख होऊन अस्त पावणं, प्रश्नच सगळे नाहींसे करून टाकणं, किंवा बाहेर फैलावत जाणं. मी वाढीचं आंधळं तत्व स्वभावतः अनुसरत गेलो. खाल्लेलं मला पुन्हां खातां आलं नाहीं, भूक आठवतां आली, चवी मात्र क्वचित् स्मरल्या. होऊन गेलं तें सगळं रक्ताला मिळालं. स्वभाव भुईसारखाहि झाला आणि बीजांसारखाहि. आंतबाहेर पेरणी करत गेलो. पावसाची वाट पाहिली. ठार आंधळ्या, झगडत्या मुळांचा विस्तार अंगभर झाला, वर उठाव केला फांद्यांचा आणि आक्रोशांचा, दुःखांचे तीव्र हिरवे पल्ले, आरण्य उत्सव.

का ही माणसं मिळवली, हे काय जमवलं, भोगलं, मानलं, जगलों ?

सगळंच थेट आणि सीधं आहे. मी हा मूळबिंदु. त्याला फसवणूक ठाऊक नाहीं कारण तो अस्तित्वांतच आहे. जग हा दुसरा मूळबिंदु त्यांत मायावी कांहींच नाहीं कारण सगळ्या चेतना त्यांतून येतात. पण ह्या दोहोंची सततची धूसर धुमश्चक्री, जीवन आणि मरणांतलं झुंजुमुंजु, ह्या झांजांवर पडणाऱ्या झांजा — हें काय ? — हेंच शोधायला आमची गंडस्थळं प्रवृत्त होतात.

मी माझ्यापुरताच विचार करूं शकलों तरी हा अस्तित्वाचा प्रश्न जिवंतपणें सुटेल. सगळंच जिथें प्राचीन आणि अपरंपार आहे तिथें फक्त होणारा मी हाच जिवंत, नवीन, भविष्यत्. मूळचा उद्देश, मूळचं स्फुरण, मूळची प्रतिभा ह्या गोष्टी प्रत्येकाच्याच आपल्या. प्रत्येकच परवलीचा पशू. प्रत्येकच भलत्याच अवकाशांत लोटलेली फांदी, भलत्याच मातींत पडलेलं मूळ. इथें फक्त हे अंधुक शब्दांचे आघात एकमेकांना काय ते सांगायला धजतात. इथें फक्त इतरांचे काळोखलेले आलेख आणि स्वतःचीच एकाकी सजीव रेघ उमटते. हो, मी हिंस्र आणि बेवारशी, मी हिंस्र आणि बेवारशी, नागडा ह्या कोट्यावधि सालींच्या आवरणांच्या जगांत, ह्या कांद्याच्या सालींखालीं, ह्या जगांत, घामाचा, रेताचा, मुताचा वास येणारा मी, बेवारशी, हिंस्र. पंचवीस वर्षं स्मरणांत गाडलीं तरी काय, जन्म गाडून गाडता येत नाहीं अजून.

(संपूर्ण)












**पूर्व कथासूत्र —**

**बेटावर उतरलेले जपानी सर्वत्र पहाणी करतात. खड्डयांत लपलेलीं हीं दोन माणसें त्यांना सांपडत नाहींत. कांहीं रक्षक ठेवून ते निघून जातात. खाण्याविना तडफडणारे ॲलिसन-ॲन्जेला हे दोन जीव आतां जपानी रक्षकांच्या भीतीच्या छायेंत वावरूं लागतात. सिस्टर–भयभीत होते. आपला हात ॲलिसनच्या हातीं देते. तो धीर देतो. स्वतः जीव धोक्यांत घालून शत्रूच्या शिबिरांत शिरतो. अन्नाच्या पिशव्या पळवतो. लपत छपत तो आपल्या खड्डयांत पोहोंचतो. हांक मारतो "सिस्टर मी आलो आहे."**

**—–उत्तर येत नाहीं ! कारण ती तिथें नसते.**




लेखक—चार्ल्स शॉ

**अनुवादक–प्र. श्री. नेरुरकर**

[११]

## शोध

**त्या** खड्डयांबाहेर ॲलिसन निश्चल उभा राहीला; अजून त्याचा एक हात ती अन्नाची जड पिशवी घट्ट धरून होता. कांहीं आवाज ऐकूं येतो कां म्हणून त्यानें आपले कान ताणले; त्याचे डोळे विस्फारीत होऊन सभोंवार पहात होते. शत्रूने सिस्टर अँजेलाला शोधून काढलं कीं काय आणि आता ते काळोखांत त्याच्यासाठीं टपून बसले होते कीं काय ? मानवी अस्तित्व दर्शविणारा कोणताच आवाज किंवा दृश्य किंवा गंध तेथें नव्हता.

त्याने ती अन्नाची पिशवी आपल्या खड्डयांत नेली आणि तो विछाना म्हणून वापरीत होता त्या शुष्क गवतानें त्याने ती झांकून टाकली. तो होता दमलेला, भुकेलेला, तहानेलेला, परंतु सर्वांत त्याला ती जोगीण शोधून काढण्याची निकड जाणवत होती. तो त्या छोटया नदीच्या खोऱ्याच्या दिशेने खालीं जाण्यास निघाला आणि काळोखांत घेतां येईल इतका त्या जागेचा त्याने शोध घेतला. तो अधिकाधिक चिंतातुर झाला व तिला मूर्ख म्हणूं लागला. मग इतका दीर्घ वेळ ती आपल्यासाठीं ताटकळत राहील. असा विचार मनांत बाळगल्याबद्दल. तो स्वतःला दोष देऊं लागला. आपण या खेरीज काय केलं असतं, असा प्रश्न त्याने स्वतःला विचारला आणि त्या प्रश्नाला त्याला उत्तर मिळेना. आपण परत आपल्या खड्डयांत जावं व त्या अन्नांतील कांहीं अन्न भक्षण करावं, असा त्याने विचार केला, परंतु पुन्हां तिला शोधून काढण्याची निकड तो मनावेगळी करूं शकला नाही. मग, कां कुणाला ठाऊक, तो पश्चिम किनाऱ्याकडे, तेथे त्या खेडयाच्या उध्वस्त भागांकडे, गेला.

पाण्यावरील खडकावर, समुद्राच्या एका टोकाला ती बसली होती. त्याने तिला साद घातली तेव्हां ती हालली नाहीं. त्याने पुनः साद दिली आणि ती तिथून निघाली आणि निमूटपणें त्याच्याकडे पहात उभी राहिली. तिच्या स्तब्धतेचा अर्थ न कळतां, तोसुद्धां थबकला. मग अकस्मात ती त्याच्याकडे धांवत गेली आणि तिने आपले हात त्याच्यावर ठेवले आणि त्याला स्पर्श केला आणि त्याला चांचपून पाहिलें.

"तो तूं आहेस ! ओ हो, तो तूं आहेस !" ती ओरडली. सुटका व आनंद यामुळें तिचा आवाज दुभंगला होता.

ती खालीच कोसळत होती पण त्याने तिला पकडलं व घट्ट धरलं.

"तिथे, सिस्टर. तिथे... हं ठीक झालं" जणूं एखाद्या भ्यालेल्या मुलाला बोलावं तसं तो कुजबुजला. आपला आवाज निश्चल ठेवणें त्याला कठीण होत होतं.

तिचे खांदे थरथरत आहेत हें तो जाणूं शकत होता आणि भीति व निराशा तिच्यांतून बाहेर निसटत होती, हें त्याने ओळखलं होतं. या विचित्र व निराशामय स्थळीं ती त्याला किती हवी होती व तो तिला किती हवा होता हें अकस्मात त्याने ओळखलं. या विचाराने त्याला शक्ति दिली. एक हात तिच्या भोंवती ठेवीत तो उभा राहिला; तिची भीति मनांतून निघून जात होती व तिचं धैर्य परत येत होतं तोंवर तिला आधार व सुख दिल्याचं समाधान त्याला वाटत होतं. सिस्टर अँजेला आतां मुळुमुळु व मुक्तपणे रडत होती आणि त्याने तिला घट्ट धरली होती. तिच्या वाकलेल्या मस्तकावरून कृष्ण सागराकडे पहात, एखाद्या बापाने आपल्या अपत्याचं करावं तसं हळुवार शब्दांत तो तिचं सांत्वन करीत होता. एका स्त्रीचं रक्षण करावं





अनुक्रमणिका

लागणारा, त्या शत्रूंलोकांत, तो एकटाच माणूस होता. ज्यांनी तिला धाक निर्माण केला होता त्यांना त्याने मूकपणे शिव्या शाप दिले.

आणि एकाएकी एक लालभडक ज्वाला त्याच्या रक्तांतून सळसळली आणि त्याने तिला अधिकच घट्ट धरलं. आपल्या विकारांचा उद्रेक मजेने उपभोगीत, त्याने आपले डोळे मिटले आणि त्याचा मुक्त हस्त तिच्या वक्षस्थळाकडे सरकला– परंतु त्याने तो झटकन मागे घेतला आणि आपले विकार त्याने आवरले. तिच्यापासून कांहीं पावलें तो दूर सरला. थरथरत्या स्वरांत तो म्हणाला, "चल, सिस्टर, मी तुला घरीं घेऊन जाईन. चल, मागे परतूंया."

"होय," ती अधिक शांत स्वरांत म्हणाली, "होय, तुझें कल्याण होवो, मिस्टर अॅलिसन. मला वाटलं— मला वाटलं कीं आतां तूं कधींच माझ्या दृष्टीला पडणार नाहीस."

"मी अधिक लवकर येऊं शकत नव्हतो."

"तुला जाऊन इतका वेळ झाला होता," ती म्हणाली, "मला वाटलं त्यांनीं— अच्छा, मला वाटलं त्यांनीं तुला पकडलं असावं. मी तासन् तास वाट पाहिली आणि तूं आला नाहीस, आणि मला वाटलं—"

"मी कामांत होतो." त्याचा आवाज चढला, कारण तिच्यासाठीं त्याने जी बातमी आणली होती, तिनं एकाएकी त्याचं मन चवताळून उठलं. "मी अगदीं पुरा कामांत होतो. मी त्यांच्या शिबिरांत गेलो. अगदी थेट त्यांच्या शिबिरांत. मला कांहीं अन्न आणि वस्तू मिळाल्या। मला वाट पहावी लागली. खाण्यासाठीं आतां भरपूर वस्तू माझ्याजवळ आहेत. चल ये. आपल्याला कांहीं तरी खाल्लं पाहिजे."

तिला आपल्या मागे वेगाने ओढीत, तो अधिकच वेगाने चालू लागला. तिचा श्वास कोंडल्यामुळें तिला बोलताच येईना.

"मी अगदीं थेट त्यांच्यांमध्ये गेलो," पुढे चलत, तो अभिमानाने म्हणाला. "ते माझ्या सभोवार सर्वत्र होते; पण मी शांत व दक्ष होतो. मी तेथें आहे हें त्यांना कळलं सुद्धां नाहीं. धान्याची एक संपूर्ण गोणी मी पैदा केली. सिगारेटी आणि अन्न. नंतर पुरेसा काळोख झाल्यावर मी सरळ मागे परतलो आणि तूं निघून गेली होतीस. माझ्यावर विश्वास ठेव, त्यामुळ मी काळजींत पडलो. मी धूम्रपानासाठी सुद्धां थांबलो नाहीं."

त्या खड्डयांजवळ, आपल्या खड्डयांत जाईपर्यंत त्याने तिला बाहेर उभी केली आणि त्याने ती पिशवी बाहेर आणली. त्याने त्यांतून एक डबा बाहेर काढीपर्यंत ती स्तब्धपणें थांबली. आपल्या तुटक्या सुरीनें त्याने झटकन् पत्रा कापला. आंतील वस्तूंचे त्याने समभाग केले, त्या पत्र्याच्या डब्यांतील आपला भाग काढून घेतला आणि उरलेला तिच्या स्वाधीन केला.

"खा" तो घसमुसळेपणानं बोलला. "चालू कर. खा." डब्यांतील मासांच्या वासानें त्या दोघांनाही प्रसन्न केलं.

त्या प्रत्येकाला अधिक खाण्याची इच्छा होती, परंतु तशी सवलत न देण्याचा पुरेसा शहाणपणा त्याने दाखवला होता. आपलं मस्तक त्याने अगदीं जमिनीजवळ नेलं आणि सिगारेट पेटविली. आस्वाद सुखानें तो लांब झुरके घेत धूर सोडू लागला. तिचं पेटलेलं टोंक त्याने दोन्हीं हातांची अंजली करून झांकून टाकलं होतं.

ती बोलण्याची तो अपेक्षा करीत होता, पण ती बोलली नाही. ती मूकपणें अन्नासाठीं परमेश्वराचे आभार मानीत होती. तिच्या थांबण्याची वाट न पाहातां, आपल्या धाडसांचं कथन तिला करायला त्याने सुरुवात केली आणि अप्रतिहतपणें ती ऐकत होती. फक्त त्या गोष्टींतील अत्यंत रोमहर्षक टप्प्यावर वेळोवेळीं ती हुंकार देत होती. व आश्चर्योद्गार काढीत होती.

गोष्ट संपल्यावर तिनें पुष्कळ प्रश्न विचारले आणि त्याने उत्तरें दिली. त्यानंतर, जें काय घडलं होतं त्यावर विचार करीत, ती दोघे गप्प बसली. मग त्याने विचारलं, "मी परतलो तेव्हां, त्या तिथें समुद्राजवळ तूं काय करीत होतीस ?"

"मी बराच वेळ वाट पाहिली," ती विचारपूर्वक म्हणाली. "तूं परत आला नाहींस तेव्हां मी विचार करायला लागलें– त्यांनी त्यानी तुला शोधून काढलं असावं. त्यावर विश्वास न ठेवण्याचा मी प्रयत्न केला— मी दुसऱ्या गोष्टींचा विचार करण्याचा प्रयत्न केला, पण तो विचार माझ्या मनांत येतच राहिला. मिस्टर अॅलिसन, यापूर्वी इतका वेळ बाहेर असा तूं कधींच नव्हतास. त्यामुळें मला भीति वाटली. मी प्रार्थना केली आणि मग मला फार बरं वाटलं. पण जेव्हां दुपार झाली, मी पुनः काळजींत पडले आणि अचानक मला वाटलं कीं, कदाचित् तुला दुखापत झाली असावी. मला वाटलं कीं, कदाचित् तूं बाहेर गेला असशील– त्या तिथें कुठेतरी. कदाचित् तूं पडला बिडला असशील, किंवा कदाचित् एखाद्या रानटी जनावराने तुझ्यावर हल्ला केला असेल किंवा कदाचित् एखाद्या सापानें तुला दंश केला असेल. बाहेर पडावं आणि तुला धुंडाळावं अशी मला इच्छा झाली. बाहेर पडावं आणि तुला शोधावं असा सारखा मी विचार करूं लागले आणि मग मला वाटलं मी बाहेर असेपर्यंत तूं येशील. मला– मला काय करावं हेंच समजेना."

आपल्या विचारांना आवरीत ती थांबली.

मग सूर्यास्त झाला. ती बोलूं लागली, "आणि तूं येशील याची मला खात्री वाटली. पण तूं आला नाहींस. बाहेर त्या झुडुपांत तिकडे मला जनावरांचे आवाज ऐकूं येऊं लागले—आणि काळोखांत भयंकरच होतं तें. जंगलांत सर्व प्रकारचे आवाज होत होते आणि तूं आला नव्हतास. मग माझा धीर पळाला. त्यानंतर वाटलं तें विचित्रच होतं, कारण त्यांनीं तुला पकडलं असल्याची माझी खात्री झाली. मला क्षमा करण्याची तूं कोशिस केलीच पाहिजेस मी शूर होण्याचा प्रयत्न केला होता, खरोखरच मी केला होता. परंतु किती काळ चाललं होतं तें ! मला वाटलं कदाचित् तूं मरण पावला असशील."

"अच्छा, मी मेलो नव्हतो," तो म्हणाला.

"नाहींस– परमेश्वराची कृपा ! परंतु त्यावेळीं तसं मला कांहींच कळलं नाहीं. कांहीं वेळानें मला वाटलं कीं, ईश्वराच्या इच्छेपुढें मान तुकविण्याखेरीज आणखी कांहीं उरलेलं नाहीं. मला हवेंत बाहेर





अनुक्रमणिका

पडायचं होतं. बाहेर पडून खोल पाण्यांत जावं आणि सारखं चालत रहावं जोंपर्यंत—परंतु तशा रीतीनें मी पापकर्म करूं शकत नव्हते. मग, समुद्राजवळ बसावं आणि प्रार्थना करावी याखेरीज करण्यासारखं कांहीं नव्हतं. असं पहा, मरणाची कल्पना मला पसंत पडली होती. मी फक्त थांबायचं आणि प्रार्थना करायची. कधीं मी माझ्या आवाजांत प्रार्थना केली आणि कधीं मी मनोमन प्रार्थना केली. आणि लवकरच मी शांतचित्त झालें. माझ्या आत्म्याला शांति मिळाली होती. माझ्या सभोंवार सर्वत्र कुणाच्या तरी अस्तित्वाची मला जाणीव होत होती आणि त्यानंतर मी मुळींच भ्यालें नाहीं. नंतर—मग तूं आलास आणि सारं कांहीं ठीक झालं. तूं जाणतोसच, माझा मानवी संरक्षक दूर होता तरी ईश्वर माझ्याबरोबर होता."

"असं," तो म्हणाला. त्याला बरं वाटलं नव्हतं. उघडपणें तिचं धाडस त्याच्या धाडसापेक्षांसुद्धां तिला अधिक महत्त्वाचं वाटलं होतं. तिच्या कुणाच्या तरी अस्तित्वाबद्दलच्या बोलण्यामुळें विचित्रपणें व असमाधानकारकरीत्या त्याचं मन संत्रस्त झालं. जेव्हां किनाऱ्यावर त्याने तिला आपल्या बाहुपाशांत घेतली होती, त्या विकाराधीन क्षणाची कां कुणाला ठाऊक, त्यामुळें त्याला आठवण झाली. अकस्मात् क्षीण व थकावट आलेल्या रागानं त्याला पछाडल्यासारखं वाटलं. तो म्हणाला, "मी बिछान्यावर पडणार आहे."

त्याच्या एकाकी जाण्यानं आश्चर्यचकित होऊन ती कांहीं क्षण जिथें होती तिथेंच उभी राहिली. मग ती आपल्या खड्ड्यांत खाली उतरली.

सकाळीं, त्या दोघांनीं त्या गोणींतील वस्तू तपासल्या. तसं अॅलिसनला प्रसन्न वाटलं. त्यांनीं मोजणी केली होती. अमेरिकन मांसाचे चार डबे; ऑस्ट्रेलियन मांसाचा एक डबा; आंत मांस आहे हे दाखविणारे, जपानी खुणा असलेले व आकर्षक रंगीत चित्रें असलेले, दोन डबे; कॅलिफोर्नियांतील सुक्या फळांचसुद्धां एक पाकीट होतं; तांदुळाची एक दहा पौंडी पिशवी; पांढऱ्या कापडाचा एक लांब तुकडा, ऑस्ट्रेलियांतील मिठाईचा एक डबा, एक पत्र्याचा पेला, एक तुटका कंगवा, एक अर्धी पेन्सिल, ऐंशीं सिगारेटी (दोन पाकिटें अमेरिकेची व दोन जपानची) आणि जपानी आगपेटींची चार पाकिटें; एक दोरीचा लांब तुकडा आणि नऊ माशांचे गळ, जाड रबराचे किती तरी तुकडे आणि जपानी भाषेंतील एक छोटं पुस्तक. (घाईंत त्या सिगारेटी आहेत असं तो त्याला समजला होता.)

ह्या उष्ण हवेंत कोणताहि डबा उघडला कीं, लगेच त्यांतील मांस त्यांनीं खाल्लं पाहिजे हें अॅलिसनने ओळखलं होतं. म्हणून कोणताही डबा उघडण्याचं जास्तींत जास्त लांबणीवर टाकायचं त्यांनीं ठरवलं. त्या दोरीनें व गळांनीं आपण विपुल मासे पकडूं अशी त्याला आशा वाटूं लागली. आतां त्यांच्याजवळ आगपेटया असल्यामुळें ते मासे उकडणें किंवा शिजविणें त्यांना शक्य झालं होतं. अॅलिसनने सिस्टर अॅंजेलाची खात्री करून दिली कीं, प्रत्येक दिवशीं फक्त एकच सिगारेट तो ओढणार होता— कोणाही धूम्रपान भक्ताला ठाऊक असावं, त्याप्रमाणें तो अगदींच चुकीचा अंदाज होता. मासांच्या रिकाम्या डब्यांत घालून आपण आगपेटचा कोरड्या ठेवूं असेंही त्यानें तिला सांगितलें. नंतर त्यानें तिला तें कापड, तो पत्र्याचा पेला व तिच्या वापरासाठीं तो कंगवा दिला.

त्या दिवशीं, मोठ्या मेजवानीवर त्यांनी ताव मारला. त्या जोगिणीनें आपल्या वाडग्यांत तांदूळ शिजविला आणि त्यांनी मांसाचा दुसरा डबा उघडला आणि तें मांस त्यांनी भाताबरोबर मिसळलं त्या भात व मांसाच्या भोजनानंतर त्यांनी कांहीं सुकी फळें खाल्लीं शेवटीं, अशा एका आनंदाने अॅलिसनने एक अमेरिकन सिगारेट ओढली कीं, तिच्या निर्मात्यांना त्यामुळे फार मोठं समाधान प्राप्त झालं असतं. तो धूम्रपान करीत होता, तोंपर्यंत त्या जोगिणीने ऑस्ट्रेलियन मिठाईचा एक तुकडा तोंडात टाकला.

ह्या नव्या अन्नांत त्यांच्यांत बदल घडवून आणला. त्याने त्यांच्या देहाला ताकद आणली आणि ज्या निराशेच्या गर्तेत ते खोल खोल बुडत होते, त्यांतून त्यांची मने त्याने वर उचलली. आपल्या प्रदीर्घ मौनावस्थेंतून सिस्टर अॅंजेला बाहेर पडली आणि बोलूं लागली. बोलण्यासाठीं ती उत्सुक होती व हंसण्यासाठी तयार होती. अॅलिसनलासुद्धां आशावादीपणा व रंगेलपणा जाणवूं लागला. शत्रूंच्या शिबिरांतील त्याच्या यशस्वी साहसाने त्याला आपल्या स्वतःच्या बळाबद्दल आत्मविश्वास प्राप्त करून दिला होता. स्वतःशींच तो संतुष्ट होता व स्वतःबद्दल त्याला अभिमान वाटत होता.

नंतरचा एक आठवडाभर, पाळत ठेवीत, ते आपल्या खड्ड्यांत दडून राहिले. बंगल्याच्या स्वयंपाकखान्यांतून धान्य गडप झाल्याचा शोध शत्रूला लागल्यावर, बहुधा काय घडेल, याचं स्पष्टीकरण अॅलिसनने त्या जोगिणीकडे केलं होतं. प्रथमतः, त्यांच्या स्वतःच्याच माणसांनीं तें चोरलं असावं असं त्यांना बहुधा वाटेल. किंवा माकडे त्याला जबाबदार असावीत अशाही ते विचार करतील उलट, कुणा परदेशी हातानें हें काम केलं असं जपान्यांना वाटलं तर शक्य तितक्या लवकर साऱ्या बेटाचा ते शोध करतील. जर त्या बेटाचा शोध व्हायचाच असेल, तर तो एक दोन दिवसांत होईल.



परत जर कां बोर्ड लावलास तर या छत्रीच्या मागल्या बाजून बडवीन !

परंतु शोध करणारे कुणी आढळले नाहींत. आणि तरीसुद्धां, ॲलिसनच्या दृष्टीनें मुक्ततेची व आश्चर्याची गोष्ट म्हणजे, पाऊस नव्हता. त्या स्वच्छ, गरम व शुष्क अशा प्रदीर्घ दिनक्रमाबद्दल ॲलिसनला कृतज्ञता वाटत होती. पाऊस अत्यंत नकोशी वाटणारी उष्णता व शक्य तर ताप घेऊन येईल, हें त्याला ठाऊक होतं.

सकाळीं त्यांनी आपलं खाणं चांगलं चालू ठेवलं. संध्याकाळीं जंगली फळांचं छोटंसं भोजन ते घेत होते. अजूनही त्यांच्याकडे भरपूर धान्य होतं आणि भूमीखाली झोपणाऱ्या माणसांच्या दृष्टीने ते अगदी सुखासमाधानांत रहात होते

वर्तमानकालीन धोक्याची कोणतीच चिन्हें न देतां जसजसे दिवस जात होते तशी सिस्टर ॲंजेला अत्यधिक आनंदी होत होती. तिची श्रद्धा तिला एक प्रकारचं समाधान देत होती; त्या नाविकाला त्याची कल्पना नव्हती. दिवस निघून जात होते याकडे क्वचित्‌च ती लक्ष देत होती आणि हा विचित्र कालखंड परमेश्वराच्या मनांत संपवायचा आला कीं, संपणार होता याबद्दल ती स्वस्थपणें निःशंक होती. यापुढेंही जाऊन सद्यःपरिस्थिति ही तिच्यासाठीं निर्माण झालेल्या परमेश्वरी योजनेचाच एक भाग होता. अशी तिची धारणा होती. ती जरी मुक्तिदिनाची आशाळभूतपणें वाट पहात होती तरी तो प्रकट व्हावा म्हणून ती त्यावर विशेष भर देत नव्हती. तो येणार होता व तिच्या जीवनाचा एक भाग बनणार होता; ज्याप्रमाणें भूतकालांत जमा झालेले सर्व दिवस तिच्या जीवनाचा भाग बनून राहिले होते.

त्या जोगीणीच्या मनांत ॲलिसन हा एक योगायोगाने लाभलेला साथी होता; त्याहून अधिक कांहीं नव्हतं. तिच्या दृष्टीने परमेश्वरी हेतूची पूर्तता करण्यासाठी, कांहीं काळ त्या नाविकाची सोबतीण होणं तिला आवश्यक झालं होतं; अन्न आणि शारीरिक दुःखाचा समान धोका यांत ती त्याच्याबरोबर समभागी झाली होती. तो पुरुष होता व ती स्त्री होती; परंतु ह्या वेगळेपणाला तिच्या दृष्टीने कांहीं अर्थ नव्हता. तिला देह म्हणजे दुसरं कांहीं नसून अशी एक चीज वाटत होती कीं, जिच्यांत पृथ्वीवरील आपल्या अल्पकालीन वास्तव्यांत आत्मा रहात होता. एक तरुण मुलगी म्हणून जे विचार तिला संत्रस्त करीत होते, त्यांवर नियंत्रण कसं घालायचं हें फार पूर्वीच तिच्या धार्मिक शिक्षणानं तिला शिकविलं होतं. सिस्टर ॲंजेला ही खरीखुरी जोगीण होती; परमेश्वराच्या सेवेंत ती पूर्णपणे रममाण झाली होती; सामान्य देहाच्या गरजांनीं ती कधींच विकल झाली नव्हती.

तथापि ॲलिसन अधिकाधिक संकुल व संत्रस्त होऊं लागला. पहिल्यांदा ती जोगीण त्याला इतर स्त्रियांहून वेगळी वाटली होती. तिच्या मंगल, गूढ, गुणांनी झांकलेली अशी ती त्याला एखाद्या तारकेप्रमाणे दूरची व लिंगभाव–विरहित वाटली होती. सिस्टर ॲंजेलाकडे पाहण्याच्या त्याच्या दृष्टिकोनांत एक भीतीचा अंश होता— ती भीति अज्ञानाची होती. तिच्याबद्दल वाटणाऱ्या आदरभावनेंत, ती ज्याचं प्रतिनिधित्व करीत होती त्याबद्दलच्या आदरभावनेंत, ती भीति विचित्रपणें मिसळून गेली होती.

कालांतराने, त्या रानांत साथी म्हणून ते एकत्र राहिल्यावर, त्या गूढतेचा बराचसा भाग नष्ट झाला होता. दिवसां प्रत्येक जेवणांत तो तिच्याबरोबर सहभागी झाला होता; रात्रीं आपल्या खड्डयांत हालचाल करतांना त्याने तिला ऐकलं होतं. एक माणूस म्हणून तिची अधिकाधिक ओळख त्याला झाली होती. आणि तिला ओळखल्यावर, हळुहळु त्याची भीति उडाली होती– त्याचा आदर नव्हे– त्या आदराचा भाग म्हणून जी भीति त्याला वाटे ती. त्या गूढतेने हळुहळु आपली पकड घालविली होती आणि एक स्त्री म्हणून तो तिचा विचार करूं लागला होता.

बराच काळ आपल्या विचारांबरोबर तो निश्चयाने झगडत होता आणि नको त्या विचारांना त्याने दूर हांकलून दिलं होतं. परंतु मंदगतीने घडामोडी त्याच्या विरुद्ध घडत होत्या. त्या दिवशीं जपानी लोक आले आहेत ही वार्ता तिला देण्यासाठीं सुसाट धांवत गेल्यावर ती नदींत आंघोळ करतांना त्याने तिची पाठ पाहिली होती. तें दृश्य अजून त्याच्या स्मृतींत होतं; तें तो बाहेर घालवूं शकला नव्हता. तें त्यानें रात्रीं पाहिलं होतं कीं, जेव्हां त्याच्या स्वतःच्या स्मृतीवर ताबा नसे आणि इतर वेळींसुद्धां, त्याने तें दृश्य आपल्या स्मृतींतून बाहेर काढून घेतलं होतं आणि पापभावनेची जाणीव बाळगीत, ज्याप्रमाणें एखाद्या मुलानें मना केलेल्या बाहुलीबरोबर गुप्तपणें खेळावं, तसा त्या दृश्यांशी तो खेळला होता.

संध्याकाळीं उशीरा, ती पश्चिम किनाऱ्यावर कुजबुजत मासे पकडीत तेव्हां आणि कधीं कधीं काळोखांत ती परस्परांच्या अधिक निकट येत तेव्हां, आपले हात तिच्यापासून दूर ठेवणे ॲलिसनला अत्यंत अवघड गेलं होतं. तिच्या अंगाला अंग भिडविण्यापासून त्याला स्वतःला थांबवावं लागलं होतं. आपल्या खड्डयांवर ती दोघें परतल्यावर, तेहमींच त्याचं मन मुक्ततेचा आनंद व राग या संमिश्र भावनांनीं भरून जाई. अशा वेळीं तिला रात्रीचं शुभचिंतन न म्हणतां तो आपल्या खड्डयांत खाली उतरे आणि पुनः त्याचा स्वतःच्या विचारांशीं झगडा सुरूं होई व त्याची स्वप्नें त्याचा छळ मांडीत.

## (१२)

## पाऊस

**एका** सकाळीं, अगदी अचानक, जपान्यांनीं त्या बेटाचा निरोप घेतला. वस्तू वाहून नेत माणसें गटागटांनी तरीकडे जाऊं लागली. कांहीं पुरुष जहाजावर गेले आणि पुनः दिसले नाहींत. लवकरच किनाऱ्यावर फक्त तीन जपानी लोक होते. ते तिघे तरीकडून त्या बंगल्याकडे चालत गेले; काहीं क्षण ते आंत गेले, पुनः बाहेर आले आणि मग जहाजावरील इतर लोकांत सामील झाले. लगेच तें जहाज समुद्राकडे चालूं लागलं.

त्या जंगलांच्या टोंकाला असलेल्या लपण्याच्या जागेंतून ॲलिसन हें सर्व निरखून पहात होता. आश्चर्यमूढ अवस्थेंतून शक्य तितक्या लवकर बाहेर पडतांच तो घाईघाईने त्या खड्डयांकडे गेला, ओरडत,

अनुक्रमणिका








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




"सिस्टर ! सिस्टर ! ते निघून गेलेत. त्या सर्वांनीं हें वेट सोडलं आहे."

आपल्या खड्डयांतून ती धांवतच बाहेर आली. त्याला वेड लागलं आहे कीं, तो केवळ थट्टा करीत होता हेंच तिला कळत नव्हतं. झाडाच्या एका फांदीनें तिचा मस्तकवेष पकडला आणि तो मागे खेचला व तिचं डोकं उघडं केलं. ॲलिसनला आढळून आलं कीं, तिचं मस्तक आंखूड, दाट, जवळ जवळ सोन्यासारख्या पिवळ्या रंगाच्या केसांनी भरून गेलं होतं.

प्रथम ते जपानी कां सोडून गेले याचा तर्क करण्याचा प्रयत्न ॲलिसनने व त्या जोगिणीने केला. प्रत्येकाने शक्य तो अर्थ सुचविला; मग तो नाविक म्हणाला, "तर्क करायचं आपण थांबवू—या, आणि त्यांनी घेण्यासारखं कांहीं मागे ठेवलं आहे कां तें पाहूं—या."

त्यांनीं कांहीं ठेवलं नव्हतं. तो बंगला आणि उध्वस्त झालेल्या इतर इमारती पूर्णपणें रिकाम्या होत्या. तथापि, त्या खड्डयांपेक्षां तो बंगला आपल्यासाठीं अधिक चांगलं घर होईल, विशेषतः लवकरच पावसाला सुरुवात होणार होती, त्याअर्थी तें अधिक चांगलं होईल, असं त्यांनी ठरवलं.

टेकडीवरील त्या खड्डयांतून कित्येक दिवस पुरेल इतकं धान्य ॲलिसनने आणलं आणि त्या बंगल्यांत तें रचून ठेवलं. मग त्या जोगिणीचा लोखंडी क्रूस त्याने खाली आणला आणि शिल्लक असलेल्या त्यांच्या मालकीच्या कांहीं वस्तू पण आणल्या. हवेंतील स्थिरपणा आणि प्रखर अशी उष्णता त्याच्या लक्षांत येऊ लागली होती. जंगलांतील श्वापदें स्तब्ध होतीं; वारा नव्हता; झाडाचं पान हालत नव्हतं. समुद्राने आपली रत्न सदृश झळाळी हरवली होती; ढगांनी दाटलेल्या आकाशाखालीं लाटा उसळत होत्या व हळूहळु ओसरत होत्या.

आग्नेय दिशेकडे ॲलिसनने ढगांचा एक काळा जमाव पाहिला. मग पाऊस आला आणि वारा. सबंध दिवसभर पाऊस पडला; त्या रात्रीं तप्त वाफा सोडीत असलेल्या काळोखांत ती दोघें बसली आणि लोखंडी छपरावरील पावसाचं तडतडणं त्यांनीं ऐकलं.

त्यानंतर, बंगल्यातील त्याच्या जागेंत, आपल्या अवघडलेल्या झोपेंतसुद्धां ॲलिसन पाऊस ऐकत होता. तो झोपायचा आणि जागा व्हायचा आणि झोपायचा आणि जागायचा. सकाळीं तो उठला आणि पावसाची करडया रंगाची धार एखाद्या पडद्यासारखी लागलेली त्याला दिसून आली. त्या बंगल्याभोंवतीच्या जमिनीवर अगोदरच पाणी सांचलं होतं. त्या जंगलांतील हवा उष्ण उष्ण वाफांनीं न्हाऊन निघाल्यासारखी झाली होती; आपल्याला बाहेर पडण्यासाठीं जोराची धरपड करणें जरुरीचें आहे असं ॲलिसनला वाटलं.

त्यांचं उरलेलं धान्य अजून त्या खड्डयांत होतं हें आठवून ॲलिसनने आपला अंगरखा काढला, बूट व मोजे काढले, आपली विजार वर गुंडाळून घेतली आणि तो पावसांतून चालूं लागला. खड्डयांत तांदूळ भिजल्याचं त्याला आढळलं; दुसरं अन्न, आगपेटया आणि सिगारेटी, यांना धोका पोंचला नव्हता. एक मिठाईचा डबा आणि दोन मांसाचे डबे सोडून त्याने साऱ्या वस्तू पिशवींत कोंबल्या. जरुरीच्या वेळीं राखीव म्हणून पहिल्या वस्तू त्याने काळजीपूर्वक त्या दोन खड्डयांना जोडणाऱ्या लहानशा बिळांत ठेवून दिल्या. मग ती अन्नाची पिशवी घेऊन, त्या सारख्या कोसळणाऱ्या पावसांतून तो बंगल्यावर आला.

तो पाऊस इतके दिवस सारखा पडत राहिला कीं, ॲलिसनने आणि त्या जोगीणीने दिवस मोजायचं सोडून दिलं होतं. मोडतोड झालेल्या त्या खड्डयांकडे त्याने आणखी [illegible] फेरी मारली आणि आपलं उरलेलं अन्न त्याने सुरक्षित ठेवलं. कांहीं व्यायाम नाही, आणि वाफा टाकीत असलेली ती गरमी, त्यामुळें त्यांना कधीं भूक लागली नव्हती; म्हणूनच त्यांचा अन्नाचा सांठा संपुष्टांत येईपर्यंत त्यांना कांहीं वेळ लागणार होता. अर्थातच पिण्याला मात्र भरपूर पाणी होतं.

दिवसापासून दिवस गेले तरी पाऊस पडतच होता. त्यांच्या बंगल्याच्या जमिनी आणि भिंती ओल्या वाटूं लागल्या होत्या; त्यांचे कपडे कधींच खरोखर सुकलेले नव्हते. त्यांची मनें व्यापून टाकणारा कोणताच तत्काळ धोका नव्हता; कांहीं काम असं त्यांना नव्हतंच. ॲलिसन बसायचा किंवा पडून रहायचा, नाहींतर पावसाकडे पहात व कितीतरी सिगारेटी फुंकीत सबंध दिवसभर शतपावली करायचा. सिस्टर ॲंजेला मूक आणि अलिप्त अशी बनली; ती एकसारखी प्रार्थना करायची आणि कधीं कधीं रडत रहायची.

परस्पराशीं बोलण्यासारखं त्यांच्याजवळ फार थोडं होतं. त्यांच्याजवळ करण्यासारख्या योजना नव्हत्या, पार पाडण्यासारखी कर्तव्यकर्मे नव्हती, पाऊस पहाणें किंवा ऐकणें याखेरीज कांहीं नव्हतं. कधींतरी हा काळ संपणार आहे असं ते पुढे पाहूं शकत नव्हते; आपण कुणाच्या तरी आढळांत येऊं अशी आशा पण दिसत नव्हती. तास, दिवस, रात्रीं यांच्या आकारांना आकृतींना अर्थ उरला नव्हता. मात्र तेथें अनंत पाऊस पडत होता आणि दुसरं कांहीं नव्हतं.

एका योगायोगामुळें त्यांच्या परिस्थितींत बदल घडून आला. तो अशा वेळीं घडला कीं, ज्यावेळीं ॲलिसनला आपल्या सोबतीणीबद्दल एक प्रकारचा सुप्त तिरस्कार वाटूं लागला होता. तो अशा प्रकारचा तिरस्कार होता कीं, जो कधीं दोन माणसांना—जेव्हां ते फार काळ एकत्र असतात, आपल्या माणसांपासून दूर असे आणि त्यांच्याजवळ लक्ष गुंतवून टाकणार असं कांहीं करण्यासारखं नसतं, तेव्हां वाटतो. ॲलिसनला सिस्टर ॲंजेलाबद्दल अशा प्रकारें वाटूं लागलं होतं. ती जोगीण जर बोलली, तर तिच्या शब्दांमुळें त्याचा संताप होई. जर ती स्तब्ध राहिली, तरीसुद्धां त्याचा संताप होई. एकदां तर इकडे तिकडे ती चालत असतांना तिने थांबावं म्हणून तो








जवळ जवळ तिच्या अंगावर ओरडलाच; पुनः ती शांतपणें बसली असतां, तिच्या अंगावर ओरडण्याच्या बेतांत तो असतांनाच, तें त्याच्या ध्यानांत आलं.

अशा मनःस्थितींत. एका संध्याकाळीं ॲलिसन भिंतीला टेकून उभा राहिला; आपली त्याच्याकडे पाठ करून ती चुलीवर वाकली असतां तिला निरखून पहात राहिला. ती फार दमलेली दिसत होती आणि त्यामुळें उगीचच त्याचं मन संतप्त झालं. तो आडदांडपणें तिला म्हणणार होता, "पुनः तांदूळ कां शिजवितेस ?" आणखी शिजविण्यासारखं दुसरं कांहीं नसतांही. इतक्यांत तिच्या झग्याचं काळं कापड, जें तिच्या खांद्याला अगदीं घट्ट झालं होतं. तें हळुहळू त्याच्या दृष्टीसमोर उघडं झालं. त्या हवेनं आणि तें सारखं वापरल्यानं तें जीर्ण झालं होतं.

जें एक चिचोळं भोंक हळुहळु पडलं, त्यांतून त्याने तिच्या कांतडीचा तकाकणारा मऊपणा पाहिला. गडद काळोखांत प्रकाश दिसावा त्याप्रमाणें तें होतं. त्याचं रक्त तुफान उसळचा मारूं लागलं. त्याचा श्वासोच्छ्वास तुटक होऊं लागला; त्याचा घसा कोरडा पडला. तो पुढे वांकला; त्या इवल्याशा मांसळ भागावर दृष्टि खिळवून तो नेत्र सुख घेऊं लागला; आपल्या हातांनी तो झगा फाडून दूर टाकावा अशी त्याला इच्छा झाली. जोंवर तो झगा संपूर्ण होता तोंवर एखाद्या पोलादी चिलखताप्रमाणें त्यानें तिचं रक्षण केल्यासारखं वाटत होतं. पण आतां तो फाटला होता. आणि अकस्मात त्याला साक्षात्कार झाला कीं, त्यांच्यांत आणि त्या स्त्रीमध्यें येणारा तो एक कापडाचा यकश्चित तुकडा होता त्याने तिच्या दिशेनें पाऊल टाकलं, तिचं तोंड आपल्याकडे वळवलं, हात पुढें सारले आणि तिचा मस्तक वेष मागे सारला, मग आपलं तोंड जोरानें तिच्या तोंडाला भिडवीत, तिचं शरीर आपल्याजवळ बळजबरीनं खेचीत, त्याने तिच्या ओंठांचं चुंबन घेतलं.

क्षणभर तिनं कांहींच हालचाल केली नाहीं. असं कांहीं घडतं आहे यावर तिचा विश्वासच बसेना. तिचा थंडपणा म्हणजे तिची कबुली असं समजण्याची त्याने चूक केली व आपलं तोंड वर उचललं. मग तिने त्याला इतक्या जोरानं दूर ढकलून दिलं कीं, तो तिला हातांत पकडून ठेवूं शकला नाहीं. तिने आकांताची किंकाळी मारली आणि ती पळाली. त्याने तिला सहज पकडली आणि तिला बळजबरीनें गप्प करीत त्याने तिला घट्ट दाबून धरली; तो एकसारखा म्हणत होता, "सिस्टर ! सिस्टर ! मी तुला इजा करणार नाहीं. माझं ऐक. ऐक."

रडत ती धडपड करीत होती, "मला सोड. तूं मला सोडलंच पाहिजेस."

"नाहीं. तुला ऐकलंच पाहिजे. मी तुला ऐकायला लावीन."

अचानक ती स्तब्ध राहिली. आपल्या हातांत ती थरथर कांपते आहे असं त्याला वाटलं.

"ठीक आहे." ती थंडपणें म्हणाली.

त्याने तिला आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न केला, पण निर्धारानें तिने स्वतःला त्याच्यापासून दूर ठेवलं होतं; म्हणून त्याने तिचा हात आपल्या एका हातांत ठेवला आणि आपला दुसरा हात तिच्या खांद्यावर राहूं दिला.

"अशा रीतीनें वागण्याचा काय उपयोग आहे बरं ?" आपला स्वर हळुवार करण्याचा प्रयत्न करीत त्यानें विचारलं. "इकडे ये आणि मला तुला बाहुपाशांत घेऊं दे."

"नाहीं !" ती ओरडली. तिचं ओरडणं म्हणजे जवळ जवळ ती किंकाळी होती.

तिला दूर पळू न देण्यासाठीं त्याने तिचा खांदा घट्ट धरून ठेवला.

"कुणाला काय कळणार आहे ?" त्याने विचारलं. "इथें आपण फक्त दोघें. कुणाला काय कळणार आहे ?"

ती अवाक् झाली. ॲलिसननें ठरवलं कीं, ती विचार करते आहे आणि त्याला वाटलं कीं, ती संमती द्यायला तयार झाली आहे. परंतु ती आपली ताकद गोळा करीत होती.

"तुला कळेल," ती म्हणाली, "आणि ईश्वराला कळेल."

ईश्वराचा विचार करायला त्याला वेळ नव्हता.

"मला अशा प्रकारचं बोलणं ऐकवूं नकोस. जर परमेश्वर असेल, तर तो आम्हांला विसरला आहे."

"नाहीं !" त्याच्यापासून स्वतःला दूर ओढण्याचा तिने यत्न केला, परंतु त्याने तिला घट्ट धरून ठेवलं. "परमेश्वराला विसर पडत नाहीं." ती म्हणाली, "हे पवित्र माते, तुझ्या गोड मुलांसाठीं तरी तूं आमच्यावर खाली नजर टाक व आम्हांला मदत कर."

"प्रार्थनेंत कांहीं अर्थ नाहीं. ती कांहीं बदलूं शकत नाहीं. ये, सिस्टर, मला तुला बाहुपाशांत घेऊं दे."

"कृपया मला सोडून दे."

"कुणाला काय कळणार आहे ? यांतून जरी यदाकदाचित आपली सुटका झाली, तरी कुणाला काय कळणार आहे ?"

"मिस्टर ॲलिसन, तुला कळत नाहीं ? तुला कळेलच कायमचं. तूं कुठेंहि गेलास, तूं कांहींही केलंस, तरी तुला नेहमीं कळेलच."

"माझी तूं काळजी करूं नकोस." तो म्हणाला, "पहा. मला जें वाटेल तें मी करूं शकतों. मला जें वाटेल तें मी करीन आणि तरीसुद्धां कुणालाही कांहीं कळणार नाहीं. आणि जर कुणी आमचा शोध घेत आला आणि तुला मी ठार मारलं तर मला कोण अडथळा करणार आहे ? मग कुणाला कळणार आहे ?"

तिला बसलेल्या धक्क्यानें ती निःशब्द झाली.







अनुक्रमणिका

ॲलिसन म्हणाला, "परिस्थिती कठीण कां करतेस ? माझ्याशीं चांगली वाग आणि तशा प्रकारचं तुझ्याशीं मला कांहीं करावं लागणार नाहीं. असं कर."

पुन: एकदां, भीतीच्या धसक्यानें, तिने मूकपणें प्रार्थना केली आणि शब्दांचं वरदान तिला देण्यांत आलं.

"क्षणाच्या एका पापी वासनेसाठी निश्चितच तूं तुझ्या आत्म्याला नरकांत पाठविणार नाहींस. आपल्या आकाशांतील पित्यानें तुझ्याकडे पहावं अशी तुला इच्छा होत नसेलच आणि—"

"बंद कर तें बोलणं !" शिव्या घालीत तो ओरडला. त्याच्या हातांची जलद हालचाल झाली आणि त्याच्या देहाचं वजन तिच्या देहावर पडलं. विनवणीची आणि दारूण भीतीची एक तुटक, ओंगळवाणी किंकाळी तिने मारली. त्यामुळें तो कांहीं क्षणभर थबकला आणि त्या क्षणांत तिला अशी कांहीं प्रचंड शक्ति प्राप्त झाली कीं, आपल्या अंगावरून तिनें त्याला दूर फेंकून दिलं. तो शुद्धीवर येण्यापूर्वी, त्याच्यापासून स्वत:ला हिसकावून घेऊन त्या बंगल्यांकडून ती आंधळेपणानें धांवत सुटली.

तो तिच्या मागून धांवत सुटला. परंतु ती बंगल्याकडून रात्रीच्या त्या काळोखांत धांवत सुटली आणि त्याला ती दिसेनाशी झाली. तो थांबला आणि त्याने कानोसा घेतला. तिला धांवतांना त्याने ऐकलं आणि तिच्या मागून जाण्यासाठीं त्याने उडी मारून पायऱ्या ओलांडल्या. परंतु त्या काळोखांत फक्त चाहूल घेऊनच तो तिच्या मागून जाऊं शकत होता. आणि चाहूल घेण्यासाठीं त्याला न धांवता थांबावं लागत होतं. तिच्या धांवण्याच्या आवाजानें त्याची पावलें त्या मोडतोड झालेल्या तरीकडे वळली. आपल्या पावलांकडे लक्ष न देतां धांवत असल्यामुळें एकदां तो चिखलांत पडला; स्वत:ला त्यांतून त्याने वर काढलं आणि पुढें पळूं लागला. त्या तरीकडे तो थबकला. चटकन् त्याच्या लक्षांत आलं कीं, पाऊस थांबला होता आणि इत:पर त्या धांवणाऱ्या स्त्रीची हालचाल ऐकूं येणें त्याला अशक्य झालं होतं. त्याने आपलं तोंड वर उचललं आणि तो ऐकूं लागला. त्या समुद्राच्या मंद कुरबुरीखेरीज त्याला कांहीं ऐकूं येत नव्हतं.

"कुठे आहेस तूं ?" त्याने पुकारा केला आणि पुन: कान देऊन तो ऐकूं लागला.

तेथें समुद्रध्वनीखेरीज दुसरा ध्वनि ऐकूं येत नव्हता. कान देत हळूहळू तो पुढें चालत गेला. त्या तरीच्या बाजूला किंवा जवळच्या उध्वस्त झालेल्या इमारतीमध्यें ती दडून राहिली असावी, असं त्याने ठरवलं. क्षणांतच त्याला आढळून आलं कीं, तरीच्या दिशेनें तो आपली पावलें टाकीत होता. त्या गडद अंधारांत त्याने पाहण्याचा प्रयत्न केला. ती रात्र सिस्टर अँजेलाच्या व्यक्तिमत्वानें भरून गेल्यासारखी भासत होती, परंतु तो तिला पाहूं शकला नाहीं.

"कुठें आहेस तूं ?" तो ओरडला आणि ऐकूं लागला. फक्त समुद्रानें त्याला प्रतिसाद दिला.

ॲलिसन जपून पावलें टाकीत त्या तरीवर गेला. चिंता त्याच्या विकारांना शांत करीत होती. तिने समुद्रांत उडी मारली असेल कां ? ती पाण्यांत मृत झालेली, तिथें त्याच्या पायाखाली असेल कां ? कीं, लाटांबरोबर किनाऱ्याच्या एका टोंकाला ती वहात गेली असेल ? तो क्षणभर उभा राहिला. आपण जें दुष्कृत्य केलं त्याचा त्याने धसका घेतला. आपण कांहीं तरी हरवलं आहे याची दु:खद जाणीव त्याला होत होती.

मग पुन: तो कांहीं पावलें पुढें चालत गेला आणि पुन: थबकला. त्याला काय होतं आहे किंवा त्याने काय करावें हेंच त्याला कळेनासें झालें होतें. मग त्या रात्रीं जवळच समोर, त्या नि:स्तब्धतेंत त्याने तिचा आवाज ऐकला.

"पवित्र माते, तूं मला तुझ्या बाहुपाशांत घे. माते, मला जवळ घे. भाग्यवती माते, मला कवटाळून घे. देवाच्या माते, मला तुझ्याकडे येऊं दे. माते, माझा स्वीकार कर—" तिचा आवाज एक सारखा प्रार्थना करीत होता.

ॲलिसन निश्चल उभा राहिला. जागचं हालूं न देणारं मोठं वजन आपल्यावर पडलं आहे असं त्याला वाटलं. जणूं काय तें त्याच्या शरीराबाहेर पडण्यासाठीं धडपडत आहे, इतकं स्वत:चं हृदय धडधडतांना त्याने ऐकलं. असं भासत होतं कीं, एका प्रचंड शक्तीनें त्याला सामर्थ्यहीन करून तिथें धरून ठेवलं होतं, त्याला सक्तीनें ऐकायला लावलं होतं. कुणा एका ओंगळ बोटानं त्याच्या धडधडणाऱ्या हृदयाला स्पर्श केला होता. त्याचे पाय थरथरत कांपत होते आणि अखेरची विकारवासनांची पुटें त्याच्या देहांतून व मनांतून तोंड घेऊन बाहेर पडली होती.

त्याच्या समोर काळोखांत सिस्टर अँजेलाची प्रार्थना म्हणजे एक शब्दशून्य क्रंदन झालं होतं — एखाद्या जखमी झालेल्या जनावराच्या रडण्याप्रमाणें. त्याचं हृदय हळूहळू स्थिरावलं आणि आपल्या स्नायूंवर त्याने ताबा मिळविला. तो वाकला आणि स्नेहाच्या हळुवार स्वरांत तो तिच्याशीं बोलला. ती आक्रस्ताळेपणानें ओरडली आणि निरर्थक शब्दांचा वापर करीत भराभर बोलूं लागली. तो आपल्या गुडघ्यांवर खाली वाकला आणि धुंडाळणारा आपला हात त्याने पुढें सारला आणि तिचं तोंड त्याला सांपडलं. तिचं डोकं या बाजूनें त्या बाजूला वळत होतं. तिच्या चेहऱ्याची कातडी आगीसारखी धगधगत होती.

त्या धगधगण्याचा अर्थ ॲलिसननें ओळखला. तापानें मरणाऱ्या माणसांना त्याने स्पर्श केला होता आणि याप्रमाणेंच ते धगधगत होते. हळुवारपणें त्याने त्या जोगीणीला आपल्या हातांनीं वर उचलली आणि त्या बंगल्याकडे माघारें तो तिला घेऊन गेला.

**(क्रमश)**






# रघू प्रेमांत पडतो

## त्याची एक राजकीय झलक

—राजा राजवाडे

**पडूं नये पण रघू पुन्हां प्रेमांत पडला. त्या लढ्यांत त्यानें सर्व राजकीय डावपेंचही टाकले.**

**—आणि शेवटीं त्याचा अगदीं 'सर्वोदय' झाला.**

**रघू** राजकारणांत पडलाच होता. वास्तविक पुन्हां प्रेमांत पडण्याचीं त्याला कांहीं आवश्यकता नव्हती. परंतु प्रेमांत कुणी पडावें किंवा कुणी पडूं नये याबद्दल कांहीं निश्चित नियम अस्तित्वांत नसल्यानें रघू प्रेमांत पडला. तसें पाहूं गेल्यास पडणें हा रघूचा स्थायीभावच होता. प्रथम तो म्हणे कुठल्याशा मंत्र्यांच्या गळ्यांत पडला. त्यामुळें पुढें तो राजकारणांत पडला. निवडणुकींत तर तो अनेकदां पडला आहे. त्यामुळें रघू प्रेमांत म्हणजे प्रेम करण्याच्या भानगडींत पडला तर आश्चर्य करण्यासारखें कांहीं नव्हतें. निवडणुकींत पडणें रघूला फार महागांत पडे. डिपॉझिट जप्त होई, प्रेमांत पडणें त्यामानानें कमी खर्चाचें आहे अशी रघूची प्रामाणिक समजूत झाली. कारण प्रेमांत पडायला डिपॉझिट वगैरे ठेवावें लागत नाहीं हें पाहून रघूने निःश्वास सोडला.

रघूची प्रेयसी कुंमारी मृदुबाला फार सुंदर होती. (असें रघू वारंवार सांगे खरा) ती शिकलेली होती. (व्ह. फा. पा. मार्क ७५ टक्के) ती गृहकृत्यदक्ष होती. तसेंच शिवण, निवड, टिपणादि कलांत निपुण होती. (कारण तिच्यासाठीं 'वर पाहिजे' या दिलेल्या जाहिरातींत तसें दिलेलें रघूनें पाहिलें होतें) तिच्या हिन्दीच्या चार परीक्षा (महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा पुणें) झालेल्या होत्या व ती टायपिंगहि शिकलेली होती. (स्पीड मिनिटाला ३० शब्द) एकूण काय, बायको व्हायला ज्या गोष्टी लागतात त्या तिच्याशीं होत्या. हे चाणाक्ष रघूच्या तेव्हांच लक्षांत आले. वास्तविक दुसऱ्या एखाद्या प्रेमवीराने जे केले असते ते रघूने केले नाहीं. (वास्तविक रघूनें तसे हिंदी चित्रपट अनेक पाहिलेले होते!) आणि यांतच रघूचे विशिष्ट राजकीय जीवनविषयक तत्त्वज्ञान दडलेलें आहे. परंतु रघूची (आम्ही आपले खाजगीत रघूला 'रघू' म्हणतो पण त्याचे वृत्तपत्रीय नांव लोकवेल्हाळ रघुनाथराव रोडे आहे.) राजकारणांतील ही विशिष्ट 'लाईन' रघूच्या प्रेमाच्या लाईनीच्या आड आली. कशी ते पहा.

खरें म्हणजे रघूने कु. मृदुबाला हिला एखाद्या दिलवाल्या हिन्दी नायकाप्रमाणें प्रेमपत्र पाठविले नाहीं (वास्तविक त्याचे हस्ताक्षर तसे बरें होतें) कीं, तिची चोरून भेट घेऊन आपल्या 'दिलकी बात' सांगून तिची 'दिलकी धडकन' ऐकली नाहीं. कारण रघूनें तसें कांहीं केले असते तर रघू आणि सामान्य प्रेमिक यांत काय बरें फरक उरला असता? राजकारणांतील निरनिराळे प्रश्न सोडविण्यासाठीं उपलब्ध असलेल्या मार्गांचाच वैयक्तिक जीवनांतील प्रश्न सोडविण्यासाठीं उपयोग करावा हें रघूचें आवडते मत होते आणि त्याने हें मत त्याच्या 'राजकारण आणि जेवण' या ग्रंथांत ठासून मांडले आहे. सहाजिकच आपल्या प्रेमप्रकरणांतहि रघूनें राजकारणांतील त्याचे आवडते मार्ग वापरले नसते तरच नवल! तसेंच लोकांपासुन, राजकीय नेत्यानें कांहींही लपवून ठेवणें पाप आहे असें रघूचें मत असल्यानें रघूनें वेळोवेळीं आपल्या पुढ्यांतील दै. 'लोकलाथा' या दैनिकांतून आपल्या प्रेमप्रकरणाच्या प्रगतीच्या बातम्या रोज द्यायचे ठरविलें. म्हणजे मग कुठल्यातरी कुटाळ वर्तमानपत्रानें ओरडून सांगायला नको. "ही पहा रघुनाथराव रोडे यांची भानगड." रघूच्या डावपेंची स्वभावाची यावरून कल्पना येईल.

रघूचा लोकांप्रमाणें लोकशाही पद्धतीवर विश्वास होता. प्रत्येकाच्या मताला किती किंमत असते (हें निवडणुकींतील अनुभवानें) त्याला चांगलें ठाऊक झालें होतें म्हणून आई आणि बाबांच्या हायकमांडला डावलून आपणच मिस् मृदुबालाशी प्रेमविषयक बोलणी करणें योग्य नव्हे असें रघूला मनोमन वाटलें. हायकमांडच्या मताला किंमत देणें जरूर आहे हें रघूनें ओळखलें. रघूनें मिस् मृदुबालेच्या आईवडिलांस पत्र पाठविले ते येणेप्रमाणें :—

श्री. रामराव टोमणे व सौ. सत्य-

भामाबाई टोमणे यांस स. न. वि. वि. आपणाला पत्र लिहिण्याचें कारण कीं, आपली कन्या कुमारी मृदुवाला हिने माझ्या हृदयाची सीमारेषा ओलांडून आक्रमण केले आहे. आजवर तिने अनेकदां नजरांनीं इष्काचा गोळीबार केला. पण मी स्वसंरक्षणार्थही उलट हल्ला केला नाहीं. कारण अखेर हे गोड आक्रमण आहे. हे आक्रमण परतविण्याचा प्रश्नच नाहीं. तेव्हां साध्या भाषेंत सांगायचें म्हणजे माझे तुमच्या मुलीवर चक्क प्रेम बसले आहे. लोकशाहींत मताला फार किंमत असते. म्हणून याविषयींचे आपले दोघांचें मत अजमवावे म्हणून हे पत्र लिहीत आहे. हायकमांडला डावलण्याचे धोरण मला कधींही पटत नाहीं, असो.

आपला,

लो. वे. रघू रोडे.

रघूने या पत्राची प्रत दै. "लोकलाथा"ला प्रसिद्धीसाठी दिली. "लोकलाथा"नें हेडींग दिले.

"लोक वेल्हाळ रघुनाथराव रोडे यांचे कु. मृदुवालेच्या हायकमांडला पत्र"

दै. लोकलाथामध्यें आलेली बातमी व पत्र पाहून श्री. व सौ. टोमणे जाम उखडली. आपल्या सोन्यासारख्या मुलीवर हा टिन्पॉट राजकीय पुढारी प्रेम करूं पहातो आहे याचा त्यांना मनस्वी संताप आला. श्री. टोमणे म्हणाले कीं, कुठल्याही राजकीय विषयावर भाषण ठोकण्याइतकी कुठल्याही मुलीवर प्रेम करणें सोपे नसते. म्हणावे !" दोघेंही जाम चिडली आणि त्यांची मुलाखत घ्यायला आलेल्या वार्ताहरांना त्यांनीं सांगितले कीं, आम्ही रघुनाथरावांच्या पत्राला उत्तर तयार करीत आहोत.

दुसऱ्या दिवशीं पेपरांत मथळा झळकला.

"हायकमांड प्रेमवीर रघुनाथरावांच्या पत्राला उत्तर देणार !"

आणि दोनच दिवसांत खालील पत्र प्रसिद्ध झालें,

श्री. रघुनाथराव रोडे यांस :—

आपलें पत्र मिळाले. आमच्या मुलीनें आपल्या हृदयावर केलेल्या गोड आक्रमणाची बातमी समजली. तिने म्हणे आपल्या हृदयाचा सीमाभंग केला आहे. आपल्या पक्षाच्या राजकारभारासारखाच आपल्या हृदयाचा कारभारही गलथान दिसतो. आपल्या हृदयाची संरक्षण-व्यवस्थाही कच्ची दिसते. आपण आमची मुलगी चि. मृदुवाला हिच्यावर प्रेम करतां असे बिनदिक्कतपणें लिहिले आहे. आमची मुलगी म्हणजे जगाच्या उकिरड्यावर पडलेला एखादा चिवट राजकीय विषय आहे अशी आपली समजूत झाली काय ? तरी आमच्या मुलीवर प्रेम करण्याच्या फंदात न पडतां आपल्या देशावर (सुजलाम् सुफलाम् मलयज-शीतलाम्) प्रेम करा. राजकारणाची हळद लावून पिवळ्या झालेल्या तरुणाला




**प्रेमाचा विजय झालाच पाहिजे.**

मुलगी देण्याचा नुस्ता विषय काढला तरी मृदुवालाची आई रागानें हिरवी-पिवळी होते आणि मीही लालेलाल होतो. तरी आमचा हा टेक्निकलर निषेध तात्काळ ध्यानांत घ्या. कळावे.

आपले,

श्री. व सौ टोमणे.

हायकमांडच्या वरील पत्राची प्रत वृत्तपत्रांत प्रसिद्ध होतांच जनतेंत प्रचंड खळबळ माजली. (हे रघूच्या प्रसिद्धी-पत्रकांतले शब्द.) लगेच वार्ताहर "रघूला तुमचे पुढचे धोरण कसें रहाणार" असें विचारूं लागले. तेव्हां रघू म्हणाला कीं, मी दि. ४ च्या वृत्तपत्रपरिषदेंत धोरणविषयक घोषणा करीन.

दिनांक ४ च्या वृत्तपत्रपरिषदेंत रघूनें घोषणा केली. पेपरांत रिपोर्ट आला. "रघुनाथराव हायकमांडला नमविणार !" "सत्याग्रहाचें शस्त्र उपसण्याची श्री. रघुनाथरावांची सिंहगर्जना !"

रघुनाथरावांनीं वार्ताहरांना असें सांगितले कीं, हायकमांडच्या हुकुमशाही धोरणाचा पाडाव करण्यासाठीं ते त्यांच्या घरासमोर सत्याग्रह करणार आहेत. सत्याग्रह दि. १० पासून सुरू होईल. सकाळीं आठ वाजतां पहिली तुकडी सत्याग्रह करील. ज्या तरुण-तरुणींना प्रेमांत अपयश आलेले आहे तेही या सत्याग्रहांत भाग घेतील. नंतर संध्याकाळी शिवाजीपार्कवर सर्वपक्षीय सभा होऊन पुढील लढ्याची दिशा ठरेल.

दिनांक १० रोजीं सत्याग्रहाचें रणशिंग फुंकलें गेलें. प्रथम श्री. रघूनें प्रेमभंगीत तरुणांसमवेत सत्याग्रह केला. नंतर लागोपाठ 'कॉलेज तरुण प्रेमभंग आघाडी', 'सिनेनटी प्रेमसंघ', 'अखिल भारतीय दिलसंवर्धक मंडळ' वगैरे प्रेमभंगाला वाहिलेल्या संस्थांनीं सत्याग्रह केले. सत्याग्रह चालू असतां खालील घोषणा देण्यांत आल्या.

"हायकमांड मुर्दाबाद, रघुनाथराव झिंदाबाद" "रघुको लडकी दे दो नही तो खुर्ची खाली करो !"

"जीतेगा जीतेगा, रघूका प्यार जीतेगा"

याच घोषणा असलेले फलकही सर्वत्र दिसत होते. संध्याकाळीं चारपर्यंत सत्याग्रह चालला होता. परंतु चौकशीअंतीं असें कळून आले कीं, हायकमांड मुळीं घरांतच नव्हते. आपल्या मुलीसहवर्तमान ते







अनुक्रमणिका

आदल्याच दिवशीं खंडाळ्याला निघून गेले होते!

संध्याकाळच्या सर्वपक्षीय सभेंत हायकमांडच्या या पळपुट्या धोरणाचा कडकडीत निषेध करण्यांत आला. सर्वपक्षीय सभेचा एकंदर सूर असा होता "आज देशाला रघुनाथरावांची अत्यंत गरज आहे. तेव्हां आपल्या मुलीवरचें रघुनाथरावांचे प्रेम मान्य करून देशाच्या प्रगतीला हातभार लावणें हे हायकमांडचे कर्तव्य आहे. परंतु तसें न करतां जनताद्रोही धोरण स्वीकारून श्री. टोमणे रघुनाथरावांच्या महान् प्रेमाला सुरुंग लावूं पहात आहेत. तरी त्यांनीं हे हुकुमशाही धोरण सोडून रघुनाथरावांशीं तात्काळ वाटाघाटी सुरूं कराव्यात. अशा अर्थाचा ठरावही सभेंत पास केला. व त्याच्या प्रति श्री, सौ. व कु. टोमणे यांना पाठविण्यांत आल्या.

दुसरे दिवशीं सभेच्या रिपोर्टासोबत एक बातमी पेपरांत झळकली !

"महान् सर्वोदयी संत श्री. बंडलबुवा बावडेकर रघुनाथरावांच्या प्रेमप्रकरणांतून उद्भवलेल्या पेचप्रसंगांत मध्यस्थी करणार. !"

असें समजते कीं, ते उभय पक्षांस भेटून वाटाघाटी करण्यास आवश्यक असलेलें वातावरण तयार करतील. ही बातमी प्रसिद्ध होतांच प्रत्येक पक्षानें हा आपल्याच धोरणाचा विजय कसा आहे ते सांगणारी निवेदनें प्रसिद्ध केलीं. श्री. बंडलबुवानी लगेंच दोन्हीं पक्षांच्या भेटी घेण्यास प्रारंभ केला. प्रथम त्यांनीं श्री. टोमणे यांची स्वतंत्र भेट घेतली. नंतर सौ. टोमणे यांची व शेवटीं कु. मृदुवाला टोमणे यांच्या वेगवेगळ्या भेटी घेतल्या भेटीचें पर्व सुरूं झाले. पेपरांत बातम्या येऊं लागल्या,

"कु. टोमणे—बंडलबुवा यांची गुप्त





वाटाघाटी ! वाटाघाटी !!

भेट मेटींत काय घडले ते सांगण्यास कु. मृदुवाला—बंडलबुवांचा इन्कार !"

दुसऱ्या दिवशीं बातमी झळकली.

कु. टोमणे—बंडलबुवांची पुन्हा भेट. समेटाची आशा दुरावली ?"

लगेच यावर रघूची तीव्र प्रतिक्रिया आणि आमरण उपोषणाची धमकी छापून आली. चवथ्या दिवशीं बातमी आली.

कु. मृदुवाला—बंडलबुवांच्या पुन्हा वाटाघाटी—रात्रीं बारापर्यंत निर्णय नाहीं."

या मथळ्याखाली लिहिले होते कीं, वाटाघाटी बहुधा उद्यापर्यंत पूर्ण होतील व परवापर्यंत कु. मृदुवाला—बावडेकर आपले संयुक्त निवेदन प्रसिद्ध करतील. लगेच सायंदैनिकांत बातम्या झळकल्या.

"रघुनाथरावांच्या प्रेमप्रकरणाची पूर्तता होणार ?"

"बावडेकरांची मध्यस्थी यशस्वी ?"

"रघुनाथरावांचा प्रेमप्रकरणांत महान् विजय ?"

सगळीकडे औत्सुक्यानें ताणलेले वातावरण पसरलें. निरनिराळ्या प्रेमभंगविषयक संस्थांनीं श्री. रघुनाथरावांचा जंगी सत्कार करण्यासाठीं 'रघुनाथराव प्रेमविजय सत्कार समिती' स्थापन करून फंड उभारला व कार्यक्रमाचा कच्चा आराखडा जाहीर केला !

अखेर कु. मृदुबाला—बावडेकर वाटाघाटीच्या निर्णयाचा दिवस उजाडला आणि सर्व प्रकरणाला नाट्यपूर्ण कलाटणी देणाऱ्या बातम्या ठळक अक्षरांत झळकल्या !

"कु. मृदुवाला—बावडेकर विवाहबद्ध !"

"मध्यस्थानें केलेला महान द्रोह !"

"सर्वोदयी ब्रह्मचारी चतुर्भुज झाला !"

असे समजते कीं, कु. मृदुवाला टोमणे आणि मध्यस्थ श्री बंडलबुवा बावडेकर हे एका गुप्तस्थळीं विवाहबद्ध झाले आहेत. इतकेंच नव्हे तर ते विमानानें हनीमूनसाठीं काश्मीरला रवानाही झाल्याचें समजते. वाटाघाटीच्या तंत्राचा हा महान पराभव आहे. असें जाणकारांचे मत आहे. तसेंच लोकशाही तत्वांचाही हा महान पराभव आहे. प्रेमासारख्या वैयक्तिक बाबतींत राजकीय तंत्राचा उपयोग केल्यास माणसाचें जीवन किती उध्वस्त होईल व त्याची कशी हृदयविदारक शोकांतिका होईल. याचें हे ढळढळीत उदाहरण आहे. आपला प्रेमप्रश्न सोडविण्यासाठीं राजकीय मार्गाचा अवलंब न करतां श्री. रघुनाथरावांनीं जर आपल्या प्रेमपात्राची एकदां तरी भेट घेण्याची तसदी घेतली असती तरी त्याची आज होणारी फटफजिती टळली असती.

दुसऱ्या दिवशीं वर्तमानपत्रांत आणखी एक धक्कादायक बातमी प्रसिद्ध झाली.

"श्री. रघुनाथरावांचा क्रियाशील राजकारणाला रामराम ! रघुनाथराव सर्वोदयांत सामील !"

रघुनाथरावांच्या या निर्णयाचे विश्लेषण करतांना त्यांनीं सांगितले कीं, श्री. बंडलबुवा बावडेकर यांनीं गृहस्थाश्रम स्वीकारल्यामुळें सर्वोदयाचे फार नुकसान झालें आहे व त्याला अप्रत्यक्षपणें मीच जबाबदार आहे. मी जर प्रेमांतच पडलो नसतो तर सर्वोदयाची अशी हानी झाली नसती म्हणून सर्वोदयाची हानी भरून काढण्यासाठीं मीच सर्वोदयाला वाहून घेत आहे.

श्री. रघूचे हे निवेदन वाचून लोक थक्कच झाले. कुणीसा विचारवंत नंतर म्हणाला :

"पडणें हा राजकारणी माणसाचा स्थायीभाव आहे. मग ते निवडणुकींत असो... प्रेमांत असो नाहींतर नंतर (नाइलाजानें) सर्वोदयांत असो !"



सर्वोदय ! सर्वोदय !!

चर्चा सुरू होते. पाऊस आणि रसिकतेवरून घसरत घसरत ती जिलबीवर येऊन स्थिरावते. आणि मग मूलभूत प्रश्न उपस्थित होतो **'जिलबी कुठें आहे ?'**

खूप शोध होतो. पण सांपडत नाहीं. बघा, तुम्हांला तरी सांपडते कां ?



# जिलबी कुठें आहे

—भास्कर कविमंडन

**स्थळ** :—बापूची खोली. खोलीच्या भिंती निरनिराळ्या छटांनीं रंगविल्या आहेत. एकीकडे 'मॉडर्न आर्ट'चे एक मोठे चित्र आहे. त्यावर शीर्षक आहे—'प्रेषित' !

**वेळ** :— रात्र ९.

**प्रसंग** :—स्थानिक वाङमय–प्रेमी मंडळीचा बहुरंगी अड्डा नेहमीप्रमाणें जमणार आहे. संख्या कमी पण विविधता बहुत, अशी या अड्डयाची स्थिति आहे. वाङमयीन चर्चा करणें हे या कंपूचें काम आहे.

**पात्रे** :—

१) **बापू** : खोलींतील भाडेकरू....उत्साही..प्रामाणिक.. भोळसट...वय ३०.

२) **जोशी** : नुकताच विद्यापीठाच्या तडाख्यांतून सुटलेला शंका-ग्रस्त तरुण. अविवाहित..अस्थिर...शंका निर्माण करून पेचप्रसंग निर्माण करण्यांत पटाईत ! वय–२९.

३) **नाना** : पोक्त..वय–५०. मार्गदर्शकाची भूमिका न विसरणारा. मधेच गंभीर मुद्दे सुचवून चर्चेला भलतेच वळण देणारा.

४) **तात्या** : जुन्या मराठी साहित्याचा भाबडा भक्त. कुठेंहि एखादें जुने पाठ केलेलें वाक्य उच्चारून मोकळा होणारा. वय–४०.

घरमालक–वृद्ध–वय-६०.

(बापू सर्व मंडळींची वाट बघत खोलींत फेऱ्या घालतो आहे. मधूनच आठवण झाल्यासारखे करून, तो थांबतो. एक लांब कागद उकलून भिंतीवर ठोकण्यास सुरुवात करतो. त्या कागदावर मोठ्या अक्षरांत लिहिले आहे—'वाङमय चर्चेत उत्तरांपेक्षां प्रश्नांना जास्त महत्त्व आहे !' बाहेर पाऊस पडत आहे...इतर मंडळी येतात.)

**बापू** : या मंडळी ! आज थोडा उशीर झाला, नाहीं ? नऊ वाजून गेलेत.

**तात्या** : बाहेर पाऊस किती कोसळतो आहे !

**नाना** : रसिकाला पावसाहून अधिक प्रिय दुसरं काय आहे ?

**जोशी** : म्हणजे काय ? रसिकानें पावसावर प्रेम करावे ? म्हणजे जो पावसावर प्रेम करतो तोंच रसिक, असं तुम्हांला म्हणायचं आहे काय ?

**ता.** : अशी व्याख्या मराठी साहित्यांत मी तरी कुठें वाचली नाहीं !

**ना.** : [गोंधळून] अहो पण.....

**जो.** : व्याख्या करतांना स्पष्ट बोलायला नको कां ? रसिकत्वाची कल्पना नसतांना बोलणं हें धाडसच आहे !

**ता.**: यामुळेंच साहित्यांत घोळ घातला जातो.

**ता.**: अहो पण मला असं...

**जो.**: हे बघा नाना, तुम्हांला काय म्हणायचंय् हें आम्हीं केव्हांच ओळखलं. पावसावर प्रेम करणारा तो रसिक, ही कल्पनाच तुम्हांला मांडायची ना ? कीं, आणखी कांहीं स्पष्टीकरण द्यायचं आहे ?

**बा.**: ('या मंडळी' म्हणून तो स्वतः खाली बसला होता....पण बाकीची मंडळी अजूनहि आपआपल्या उघडया छत्र्या घेऊन उभीच असतात. उघडया छत्र्यांखालीं वाद सुरू असतो. हें पाहून, कांहींतरी आपलेंच चुकले असलें पाहिजे, असें वाटून, बापू हळूच उभा राहतो ! त्याची दृष्टि नकळत स्वतःच्या छत्रीचा शोध घेऊं लागते ! नकळत तो बोलतो )—पण माझी छत्री कुठें आहे ?

**जो.** : (दरडावून) बापू, तुला छत्री कशाला हवी आहे ? रसिकाच्या व्याख्येंत तूं छत्री या कल्पनेचा उपयोग करूं इच्छितोस कां ?

अनुक्रमणिका




**बा.** : (नर्व्हस होतो. आपण बोलण्यांत चूक केलीय, हें लक्षांत येऊन व इतर सारे आपल्याकडेच बघताहेत, हें पाहून, गडबडीनें नानाच्या छत्रींत घुसतो !)

**जो.**: बापू तुझं छत्रीचं काय ?

**बा.**: कांहीं नाहीं. कांहीं नाहीं रे ... मी छत्रीचा उल्लेख चर्चेसाठीं केला नाहीं.

**जो.**: मग कशाला केला ?

**बा.**: पण आपण पावसाबद्दल चर्चा करतोय् कां ?

**जो.**: (जरा उच्चत्वाचा भाव चेहऱ्यावर आणून) हॅं ! रिडिक्यूलस! पावसाबद्दल चर्चा नाहीं...रसिकांविषयीं ही चर्चा आहे... रसिकत्वाबद्दल..या नानांनीं ही व्याख्या पुढें मांडली आहे.

**बा.**: (पुन्हां चुळबुळ करतात.) अहो पण...मला असं कांहीं म्हणायचं नव्हतं...

**जो.**: (आश्चर्य वाटून) म्हणजे ? पावसावर प्रेम करणारा, तो रसिक, असं तुम्हांला म्हणायचं नाहीं ?

**ना.**: नाहीं...यांत पावसाचा काय संबंध...नाहीं म्हणजे यांत रसिकाचा काय संबंध ? (गोंधळतात.)

**ता.** (गांभीर्यानें) हें काय ? बी क्लीअर !... तुम्हांला काय म्हणावयाचे आहे ?

**ना.**: (चिडतो) कसलं काय म्हणायचं आहे?

**जो.**: चिडू नका. पातळी राखा.

**ना.**: अरे, पातळीचं काय सांगतोस मला ? मी चर्चा केलीच केव्हां ?

**ता.**: मग तुमची ती रसिकाची व्याख्या...

**बा.**: (गंभीर शंका विचारतो) रसिकाची कीं पावसाची ?

**जो.**: स्टॉप इट् ! (नानांकडे पाहात–) मग तुमच्या मघाच्या व्याख्येचं काय ?

**ना.**: अहो पण मी कोणतीच व्याख्या केली नाहीं...असं काय करता ?

**ता.**: अँ ! मग कोणी केली ?

**ना.**: या जोशांनी...मी सहज पावसाबद्दल बोललो...सहज.. अगदी कॅजुअली ! आपण पावसांतूनच आलो ना, म्हणून...

**बा.**: (मोठ्याने हंसत) अरेच्या असं झालं कां हे ? तरी म्हटलं कीं, आज आपण वाङ्मयप्रेमी माणसं पावसाची व्याख्या कां करीत आहों ? (यावर कोणी हंसले नाहीं, तेव्हां कांहींतरी चुकलें असें वाटून) ओ सॉरी !... रसिकाची व्याख्या काय आपण करीत आहो...(पण पुन्हां चुकले हें जाणूनच चुप्प होतो.)

**ना.**: ही चर्चा नव्हतीच...सहज मी बोललो...पण आपल्या छत्र्या..

**बा.**: पुन्हां छत्र्या काय ?

**ना.**: अरे छत्र्या मिटायला नको कां ? बसा आतां खालीं... (सर्वच ओशाळतात..पण गंमत वाटली असें दाखवून हंसतात.)

**बा.**: हं मंडळी, आतां करा सुरू...

**जो.**: विषय कोणता?

**ता.**: कशाला हो हवा आहे तुम्हांला विषय ? सुरू करा... विषय आकार घेऊं लागेल.

**ना.**: (मघाचा गोंधळ आठवून) नको..नको. आकार कसला घेतोय विषय ? घेतलाच तर कुठें तो पाऊस दिसणार, नाहीं तर छत्री ! तसं नको विषय ठरवा.

**बा.**: खिशांतून हळूच कवितेचा कागद काढतो व संकोचून हे बघा मी एक कविता केलीय्.

**सर्व**: वा वा ! टाका पुढें.

**बा.**: (त्याचा संकोच गेला नाहीं.) ही कविता माझीच आहे. यावरच जर आपण चर्चा केली तर ?

**जो.**: काय हरकत आहे.? पण कविता कशी आहे ?

**ता.**: तें चर्चेनंतरच ठरावे !

**जो.**: म्हणजे ती किंचित् आहे की, नव आहे की, वात्रट आहे की विडंबनात्मक ?

**ना.**: कवितेचे इतके प्रकार असतात ?

**जो.**: मग ? तुम्हांला काय वाटलं, सारा शंभुमेळा आहे ?

**ना.**: पण कविता म्हणजे काय ?

**बा.**: (न राहवून कागद फडफडवितो) ही माझी कविता...

**ता.**: कविता म्हणजे रसात्मक वाक्य....

**जो.**: हे बघा, संस्कृत किंवा मराठी जुन्या कल्पना आम्हांला नकोत.

**ता.**: कां नकोत ?

**जो.**: अहो तुमचं स्वतःचं कांहीं सांगाल कीं नाहीं ? तो मम्मट असं म्हणाला न तो वाग्भट तसं म्हणाला, हें कशाला पाहिजे ?

**ता.**: कमाल आहे. ही अश्रद्धा आहे. पूर्वपरंपरा तुम्हीं नाकारतां काय ?

('काय' ह्या शब्दावर गैरवाजवी जोर पडतो व जोशी दचकतो.)

**जो.**: नाहीं नाहीं. '(पुन्हां सांवरतो.) हो. नाकारलीच पाहिजे. कांही तरी नवीन निर्माण केलं पाहिजे.

**ता.**: पूर्वपरंपरा नाकारणारा खोल गर्तेत जातो.

**बा.**: कुठें जातो ?

**ता.**: (त्याच्याकडे दुर्लक्ष करीत) पूर्वपरंपरेचा तिरस्कार वाटणें हा सिनिसीझम आहे.

**जो.**: आम्हांला आंधळ्या लोकांपेक्षां सिनिक् बरे वाटतात !

**ता.**: आंधळेपणा तुम्हीं कशाला म्हणतां ?

**बा.**: (अधीर झालाय) पण माझी कविता.

**ना.**: खरंच आंधळेपण व सीनिसीझम यांची चर्चा नंतर करा. कविता म्हणजे काय, हा विषय होता...

**बा.**: (उत्साहानें) ही माझी कविता......

**जो.**: (बापूजवळील कागद हिसकावून घेतो.) कविता म्हणजे काय हें आधी ठरवायला हवं...कविता म्हणजे हा कागद नाहीं. ही शाई नाहीं...ही अक्षरं नाहींत...ही रचना नाहीं...





बा.: (जोशीजवळचा कागद परत घेतो) पण..पण मी कागद, शाई, शब्द यांच्याशिवाय कविता कशी लिहू ?

जो.: (रागावतो). थांबरे... तुझी कविता ठेव बाजूला.

बा.: आँ! पण तोच विषय ठरवला ना आपण ?

जो.: (पूर्ण दुर्लक्ष करून) कविता म्हणजे काय? (थांबतो.) काही सांगता येत नाहीं...कवितेचं रसग्रहण म्हणजे तरी काय?

बा.: अरे पण ही माझा कविता घ्या...तिचं रसग्रहण करा. म्हणजे रसग्रहण कसं असतं ते आपोआपच कळेल...घ्या ही घ्या...

जो.: (पुन्हा दुर्लक्ष करतो.) कवितेचं रसग्रहण होऊं शकतं. यावर माझा विश्वास नाहीं.

ना.: (आश्चर्यानें) म्हणजे तुम्हाला क्रिटीसीझम अमान्य आहे ?

जो.: हो...आहेच...कसली क्रिटीसीझम तुम्हीं करणार ? सर्व पर्सनल आहे....सब्जेक्टीव्ह आहे !

ना:. म्हणजे रसग्रहण पर्सनल काम आहे कीं काय ?

जो.: अर्थात्...म्हणूनच तुमचं रसग्रहण मला मान्य व्हायचं नाहीं व माझं तुम्हांला नाहीं... म्हणून सर्वमान्य रसग्रहण अशक्य आहे.

ना.: पण मराठींतील इतकीं रसग्रहणं? त्यांचं काय करायचं ?

जो.: मुळींच वाचूं नका.

ना.: जोशी हें फार चमत्कारिक झालं आं ? असं कसं म्हणतां तुम्हीं ?

जो.: कां नाहीं? तुम्हीं पटवून द्या कीं, क्रिटीसीझममध्यें कांहीं वास्तविक, सर्वांना मान्य होण्यासारखं, असतं म्हणून...देतां पटवून ?

बा.: नाना द्याच हो पटवून? या जोशाला....ही घ्या माझी कविता....

ना.: (दुर्लक्ष करतात) देतो पटवून..हे बघा, मी एक उदाहरण देतों. समजा आपण जिलबी खात आहोंत...

जो.: (आश्चर्यानें) आधी जिलबी कशाला खायला पाहिजे.

ना.: ऐका हो...समजा जिलबी खात आहोंत...ती जर चांगली बनली असली तर आम्ही काय म्हणतो ?

ता.: छान आहे !

जो.: काय छान आहे ? ही चर्चा-पद्धत ?

ता.: नाहीं. जिलबी....

ना.: राईट! आम्हीं म्हणूं जिलबी छान आहे... असं चार-चौघांनीं जर म्हटलं तर जिलबी चांगली ठरेल कीं नाहीं ?

ता.: ठरलीच पाहिजे....

ना.: गुड! नंतर जिलबी खाऊन पोट भरलं असं समजा.

बा.: (साफ गोंधळला आहे.) पण..पण....माझी कविता जिलबीवर नाहीं हो....

ना.: (बापूकडे रागानें पाहतात.) पोट तुडुंब भरल्यावर आपण जिलबीला काय म्हणूं ? असं म्हणणार काय; की जिलबी कशी आहे हें सांगता येत नाहीं ?

जो.: हो...असंच म्हणणार....

ना.: म्हणजे जिलबीची पुंगळी चांगली आहे...रंग केशरी आहे...पाक जमला आहे, या साध्या गोष्टी पोट भरल्यावरहि आम्हीं सांगूं कीं नाहीं ? कीं विसरून जाऊं ?

ता.: कसें हो हें ? विसरतां येईल आम्हांला ? पोट भरले तरी— जिलबीची पुंगळी रिकामी कां म्हणून व्हावी बरें ?

ना.: (विजयी सुरांत) तेच तें....म्हणजे आमच्या जिल-बीच्या रसग्रहणाला सर्व मान्यतेचा आधार सांपडतो व तो केव्हांहि सांपडतो.

**जो.:** (थोडा नर्व्हस) पण जिलबी, रिकामं व भरलं पोट याचा अर्थच इथें मी समजूं शकत नाहीं.

**ना.:** (आश्चर्यानें) म्हणजे तुम्हांला—जिलबीचा अर्थ माहिती नाहीं ?

**ना.:** (रागावून) कां नाहीं ?

**जो.:** कारण जिलबी कुठें आहे ?

(सर्व मंडळी या प्रश्नाचा अर्थ न समजून बापूकडे पाहूं लागतात.)

**ता.:** (बापूकडे पाहात.) जिलबी कुठें आहे ?

**बा.:** (साफ गोंधळलेला असतो. कवितेचा कागद खिशांत ठेवून देतो व जिलबी विकत आणण्यांत घडलेली चूक स्पष्ट करण्यासाठीं बोयलण्याचा प्रयत्न करतो,...पण बोलू शकत नाहीं !...)

**ना.:** म्हणजे काय ? जिलबी कुठे आहे, याचा अर्थ काय ?

**जो.:** म्हणजे असं कीं, जिलबी ना–हीं...

**ता.:** अहो तें खरेंच...सध्यां इथें जिलबी, नाहींच.

**जो.:** मी इथल्या जिलबीबद्दल बोलत नाहीं.

**ना.:** मग तुम्हांला म्हणायचं काय ?

**जो.:** जिलबी नाहीं.

**ता.:** नसूं द्या हो ! एवढें काय त्यांत ? समजा इथें जिलबी आहे.

**जो.:** नाहीं....नाहीं ...इथें जिलबी नाहीं...आणि समजा–जिलबींतहि जिलबी नाहीं...



**ना.:** (अस्वस्थपणें) जोशी, तुम्ही फार विक्षिप्तपणानं बोलताहांत....

**जो.:** अहो खरोखर सांगतो मी तुम्हांला...

**ना.:** ( दरडावून) काय सांगताहांत ?

**जो.:** (शांतपणें) जिलबीमध्यें जिलबी न–स–तें....

**ना.:** (एकदम भडकतात.) मग त्यांत काय शेण असतं काय ?

(सर्वच वातावरण तापतें. पण जोशी थंड...)

**जो.:** (शांतपणें) नाहीं...जिलबींत शेण नसतं...

**ता.:** अहो तेच तर ते म्हणताहेत... जिलबींत साखर असते....नाहीं कां ?

**जो.:** नाहीं....नाहीं...जिलबींत कांहींच नसतं...जिलबींत जि–ल–बी नसते...

(यावर सारेच चुप होतात...काय बोलावें कुणाला समजत नाहीं...शेवटीं बापू थोरपणाचा आव आणतो. समजावणीच्या सुरांत जोशीला सांगतो...)

**बा.:** जोश्या ! अरे असं काय म्हणतोस ? आपले नाना चांगल्या जिलबीबद्दल बोलताहेत. चांगला स्वयंपाकी जर असेल, तर जिलबींत कांहींतरी असेलच कीं नाहीं ? पाक असेल....साखर असेल...केशर...

**जो.:** (गरम होतो.) चूप बैस...जिलबींत कांहीं नसतं.... जिलबींत 'जिलबीत्व' नसतं...

**ना.:** (आतां मात्र त्रस्त होतात.) मग तें कुठें असतं ?

**जो.:** हां असे सरळ या...तें जिलबीत्व आमच्याच जवळ असतं....

**बा.:** च्या ! अरे पण तुझ्याजवळच 'जिलबीत्व' आधीं कुठें तरी असेल कीं नाहीं...कीं एकदम तुझ्या पोटांत निर्माण झालंय् ?

**जो.:** चूप बैस...जिलबींत जि–ल–बी नसतें हें माझं म्हणणं आहे. ती तिथें असते असं तुम्हीं म्हणताहांत...,.ठीक आहे.... सिद्ध करा....

**बा.:** काय सिद्ध करा ?

**जो.:** कीं जि–ल–बी आहे.

**ना.:** (रात्र बरीच झाल्यानें एन्हांना पार सुस्तावून गेलेत.) काय सिद्ध करूं ? जिलबी कुठें आहे ?

**ता.:** (डुलक्या आवरीत) नाहीं. जिलबी चांगली असते हें. सिद्ध करा.

**बा.:** (चिकाटीनें) नाहीं...नाहीं...जिलबीचा व कवितेचा संबंध दाखवा. (हे सर्व ऐकून जोशी एकदम भडकतो. उठतो.)

**जो.:** छे...छे ! तुम्हां लोकांना वाङ्मयीन आस्था मुळींच नाहीं...साधी जिलबी कुठें आहे हेंदेखील तुम्हीं सांगूं शकत नाहीं...कांहीं अर्थ नाहीं....कांहीं अर्थ नाहीं...

(तरातरा निघून जातो.)

(बापूच फक्त धड जागा असल्यानें त्याला काय करावे, समजत नाहीं. झोंपलेल्या मंडळीकडे तो हताशपणें पाहात कवितेचा कागद चांचपून पाहतो. त्याचवेळीं म्हातारे घरमालक झोंप मोडलेली असल्यानें, खोलींत येतात.)

**घरमालक:**–काय बापूराव...अरे कसलं भांडण आहे ?

**बा.:** (दचकून) आँ ?

**घरमालक:**– अरे जरा जास्त जिलबी कां नाहीं आणली ? उगाच भांडण कशाला ?

**बा.:** कोणतं भांडण ? कुठली जिलबी ?

**घरमालक:**–अरे चार घास जास्त मिळाले कीं, कोणी भांडत नाहीं. उरलेली जिलबी कुठें आहे....?

(बापू आतां मात्र कामांतून गेला ! कपाळावर हात मारून तो कोसळतो !)

● ● ●



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका







## कांच घरांतील कॉंग्रेस

**बंगलोरला** कांच घरांत अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीचें अधिवेशन भरलें. अलिकडे आमचे लोक मोठे 'सेन्सिटिव्ह' झाले आहेत. त्यांना झटकन् राग येतो. रागाचें रूपांतर लगेच दगडफेक, लुटालूट, जाळपोळ, मोर्चे, दंगली वगैरेंत होते. लक्षावधि रुपयांचें नुकसान होते. अंती घडते काय ? साधते काय ? जें साधते तें व्यक्ति, समाज, प्रांत वा देशाच्या हिताचें असतें काय ह्याचा फारसा विचार होत नाहीं. मागें 'हिंदी' विरोधी आंदोलनांत माणसें जळून गेलीं. लक्षावधीचें नुकसान झालें. परवां बंगलोरच्या कॉंग्रेसच्या आधीं पेटून उठण्यासारखें घडलें काय ? तर गोव्याचे मुख्यमंत्री पंतप्रधानांना भेटले व त्यांनीं गोव्याच्या भवितव्याबाबत चर्चा केली त्यांत श्री.बांदोडकरांनीं निवडणुकीची सूचना केली व प्रसंग पडला तर त्यासाठीं राजिनामा देण्याची तयारी दर्शविली. आतां ह्यांत हनुमंतय्या, निजलिंगप्पा अॅण्ड कंपनीला एवढें रागवायचें काय कारण ? प्रश्न गोव्याच्या जनतेचा आहे व तो ते पाहून घेतील. पण लगेच निजलिंगप्पांनीं तार केली आणि कॉंग्रेसचे 'उतावळे नवरे' दिल्ली दरबार सोडून माहेरीं परत यायला निघाले. अ. भा. कॉंग्रेस अधिवेशनाचे निमित्तानें घरीं आलेल्या पाहुण्यांचे—अगदीं शास्त्री—नंदा—इंदिरा गांधींसुद्धां—दगड, विटा, काळ्या निशाणांनीं स्वागत केलें गेलें. खुद्द अधिवेशनांतही हा "तमाशा" झाला. त्यांत तर "हेच आमचे अ. भा. कीर्तीचे राष्ट्रीय पुढारी काय ?" असा संभ्रम उत्पन्न व्हावा अशी भाषणें 'म्हैसूरी' पुढाऱ्यांनीं केली. "आपल्या राज्याचा विस्तार कसा वाढवावा ह्या चिंतेत चव्हाण अधिक असल्यानें देशाच्या संरक्षणाच्या प्रश्नाकडे लक्ष द्यायला त्यांना सवड मिळत नाहीं." असा एक अतिगंभीर आरोप के. हनुमंतय्यांनीं केला. "देशाच्या रक्षणाकडे अधिक लक्ष द्या." असा सल्लाही अति उद्धटपणें त्यांनीं चव्हाणांना दिला. जणुं देशाचें संरक्षण ही चव्हाणांची एकट्याची मक्तेदारी आणि अन्याय्य दडपणें आणून जनतेची भावना दडपून टाकणें हा निजलिंगप्पा, हनुमंतय्यांची जबाबदारी असेंच त्यांना म्हणायचें होते. "जनमता"बद्दल निजलिंगप्पा, हनुमंतय्या अॅण्ड कंपनीला एवढा पुळका केव्हांपासून यायला लागला? जनतेच्या मताला मान देण्याचा नवा बदल जर ह्या मंडळींत झाला असेल तर त्यांनीं आधीं 'बेळगांव-कारवार' महाराष्ट्राला देण्याचा ठराव म्हैसूर विधानसभेंत स्वतः मांडावा व मग 'लोकमता'चें तुणतुणें वाजवावें. ह्या साऱ्या कल्लोळांत गोव्याचे अनुयायीशून्य कॉंग्रेस पुढारी काकोडकर व पोर्तुगीजांचा वारसा राखण्याची कांक्षा बाळगणारे यु. गोवन्स यांनीं मुलाखतींची धमाल उडविली. कॉंग्रेसच्या ह्या अधिवेशनांत गाजल्या दोन गोष्टी ! एक गोवा प्रश्न आणि दुसरा अध्यक्षीय निवडणुकीचा प्रश्न ! तिसरा एक प्रश्न गाजला असता. पण एकूण विरोधी सूर पाहतां, वादावादी टाळण्यासाठीं शास्त्रीजींच्या निवेदनावरच समाधान मानले गेले. कच्छ-करारविषयक निवेदनानें सारीं माणसें गप्प झालीं. कामराजांची नियुक्ति कायम झाली. राज्य-विषयक सीमा प्रश्नांबाबतचा एक "जुनी दारू नवी बाटली" प्रकारचा ठराव पास झाला. ही भावना वारंवार व्यक्त केली गेली आहे. तरीही राज्यांराज्यांतील झगडे-मारामाऱ्या चालूंच आहेत. मोरारजींनीं घेतलेली भूमिका चुकीची नव्हती. पण आज कामराज 'कष्ट' फॉर्ममध्यें आहे एवढें खरें ! गोव्याच्या प्रश्नाचा घोळ अधिवेशनानंतरही चालूंच आहे. निवडणुका घ्याव्या, घेऊं नयेत, बांदोडकर मंत्रिमंडळानें राजिनामा द्यावा काय ? दिल्यास त्याला घटनात्मक आधार काय ? दुसरी राज्य मंत्रिमंडळें असा राजिनामा देतील काय ? मग गोव्याचा अपवाद कां ? 'कोंकणी' राज्य बरें ! महाराष्ट्रीय अधिकाऱ्यांना हांकला, दहा वर्षें विषयच नको. म्हैसूरचा 'क्लेम' आहेच वगैरे अनेक मतें व्यक्त होत आहेत. एका जिल्ह्याच्या प्रश्नाला 'वैश्विक' स्वरूप आलें आहे. एरव्हीं मतांच्या संख्येपेक्षां जागांची संख्या महत्वाची मानली जाते व त्याच न्यायानें विधिमंडळें तयार होतात. पण गोव्याबाबत मात्र 'मतें मोजा', 'गृहित धरा' असा आग्रह केला जात आहे. एका विशिष्ट आकसानेंच गोवा-बेळगांवबाबत हे लोकशाहीशीं विसदृश असे विचार-पर्याय येत आहेत. 'लोकशाहीवर आमची खरीखुरी श्रद्धा आहे कीं, आपलपोटी लोकशाही आम्हांला मान्य आहे हेंच जणुं राज्यकर्त्यांना काळाचे आव्हान आहे. शास्त्री—राजवट ! 'स्वप्नरंजना'पासून अलिप्त आहे असें दिसतें. ह्या प्रकरणीं वास्तव व रोखठोक भूमिका ती घेईल काय ?

## कच्छ—काश्मीर

**कच्छ** करारावर सह्या होत असतांनाच **काश्मीर**मध्यें सशस्त्र हल्लेखोर शिरले होते. त्यांनीं ठिकठिकाणीं दारूगोळा जमवला होता. एका आंतरिक उठावाची आंवई उठवून जगाचें लक्ष त्या उद्रेकाकडे वेधावयाचें होतें. मुक्ति सैनिक म्हणून त्यांना मिरवायचें होते. सार्वमतवाले त्या साध्या वेषांतल्या सैनिकांना मानवंदना देणार होते. काश्मीरची मुक्ति-घटका जवळ आली होती. दारू ठांसून भरली होती. पण हाय ! बार फुसका



अनुक्रमणिका




ठरला. स्फोटानें आपलींच माणसें दगावलीं व भारत सैन्याचे पुढें मुसक्या बांधून शरण येण्याचा प्रसंग आला. 'काश्मीर'चे हल्ले हे पाकिस्ताननें केलेले नाहींत. त्यांच्याशीं पाकिस्तानचा कांहीं संबंध नाहीं हो नाहीं असे भूतो व अयूब सांगताहेत. विश्वास ठेवा ! कारण त्यांचा गुरु चीन आहे. आणि कम्युनिस्ट कधीं आक्रमण करीत नाहींत हा सिद्धांत आपल्या डांगे-नंबूद्रिपादांनीं चिनी आक्रमणाचे वेळीं आपल्याला पटवून दिला आहेच ! तेव्हां हे आहेत मुक्ति सैनिक ! आपण त्यांना कायमची 'मुक्ति' देऊं या ! पाकिस्तानला त्याचें सोयरसुतक नाहीं !

**"पाकिस्तानबाबत आतां अधिक वास्तववादी भूमिका घेतली पाहिजे."** शास्त्री म्हणाले. सहनशीलतेलाहि सीमा असते. वैयक्तिक अपमानांनींही माणसें खुनासारखे गुन्हे करायला प्रवृत्त होतात. राष्ट्रीय अपमान, राष्ट्रीय पौरुषाची अपमान ही गोष्ट तर गोष्ट महाभयंकर ! **पाकिस्तानच्या गोळीबाराला गोळीबारानें उत्तर मिळेल"** असें शास्त्री म्हणाले. आम्हीं त्यांच्याशीं सहमत आहोंत. भारतांतल्या अराष्ट्रीय शक्तींना व पाकिस्तानी हल्लेखोरांना असा एक रामटोला मारला पाहिजे कीं, निदान १०।२० वर्षें तरी पुन्हां पाकनें बंदुक उचलतांना विचार केला पाहिजे. पाकला फक्त शस्त्रांचीच भाषा कळते, 'सुसंस्कृताशीं' टेबलावर वाटाघाटी होऊं शकतात. गेल्या १८ वर्षांत एकहि दिवस पाकनें भारताला सुखाची झोंप घेऊं दिलेली नाहीं. म्हणूनच शास्त्रीजी म्हणतात त्याप्रमाणें 'वास्वतादी' भूमिका घेण्याची गरज आहे. इंग्रज व अमेरिकनांचें पितळ पुन्हां उघडे पडले आहे. युनो निरीक्षकांनीं घेतलेली भूमिका हीडोळे उघडणारी आहे. काश्मीरचा प्रश्न जर सुटला असेल व त्याचे विलीनिरकरण हे संपूर्ण असेल तर युनोतून हा प्रश्न काढून घेऊन पहिलें वास्तववादी पाऊल भारत शासनाला टाकतां येणार नाहीं काय ? नव्या परिस्थितींत जर "काश्मीरचें सार्वमत" डावलतां येते, तर कच्छ कराराचा पुर्नविचार अशक्य कां ठरावा ? केवढी जबर किंमत देऊन आपण 'फाळणी' विकत घेतली ! !

## साऱ्यांना "फाळणी" हवी. ऐक्य नको

**जुलै** महिन्याच्या चार तारखेला लुधियाना येथें ह्या देशांतील शिखांची एक परिषद भरली. त्यांत एक ठराव पास झाला. त्यांत भारतीय प्रजासत्ताकांत, शिखांसाठीं एक स्वयंपूर्ण व स्वतंत्र संस्थान-राज्य असावें असें म्हटलें आहे. हा ठराव पंजाब हायकोर्टाचे न्यायमूर्ति व पंजाब विधिमंडळांतील अकाली गटाचे नेते श्री. गुरनाम सिंग ह्यांनीं मांडला. अध्यक्षस्थानीं असलेल्या पतियाळाच्या महाराजांनीं हा विवाद्य ठराव येतांच आपली खुर्ची सोडली आणि ह्या ठरावाशीं जणुं आपला संबंधच तोडून टाकला. खुर्ची रिकामी राहणें हे राजकारणाला फारसें मानवत नाहीं. नेतृत्वशून्य आंदोलन उभें राहूं शकत नाहीं. ही संधी आपल्या राजकारण प्रवेशाला व नेतृत्वसंपादनाला उत्तम आहे असें समजून **मास्टर तारासिगांनीं** अज्ञातवासाचें जोखड एकदम फेंकून दिलें. आणि प्रथम ते धांवले ते राजाजींकडे—मद्रासला ! राजाजींना 'पार्टिशन'ला आशिर्वाद असला कीं, ती साकार होते तेव्हां मोठ्या (अशा) माणसाचा आशिर्वाद ह्या शुभ कार्याला असावा ही भूमिका त्यांत असावी. फाळणीचे वेळीहि राजाजींनींच 'शुभ' म्हटले होते हें तारासिगांना ठाऊक होते.

मद्रासच्या भाषिक दंगलीच्या वेळींही फुटून निघण्याची भाषा ह्याच राजाजींनीं वापरली होती हेंही कदाचित् तारासिंगांना कळलें असेल. त्यानंतर दिल्लीला त्यांनीं पत्रकार परिषद बोलावली. त्यांत त्यांनीं आपल्याला पंजाबी सुभा हवा कीं शीख सुभाणें हवा हें सांगितले नाहीं (निश्चितपणें) व त्यासाठीं आपण चळवळ करूं कीं काय ह्याबद्दलही ते कांहींच बोलले नाहींत. त्या परिषदेंत त्यांनीं हिंदु, मुसलमानांबरोबरच शिख हेही भारताच्या सार्वभौमत्वाचे वांटेकरी आहेत ह्या गोष्टीला १९४७ सालीं मान्यता दिली होती. परंतु नंतरच्या काळांत हें वचन पाळलें गेलें नाहीं. व **'लष्करी हिंदुत्वा'मुळें संस्कृतवर भर दिला गेला.**—अहिंदी भाषिकांवर हिंदीची सक्ती झाली, राज्यांच्या कार्यक्रमांत हिंदूधर्म पद्धतींची सक्ती करण्यांत आली आणि **जबलपुर, अलिगड, जमशेटपुर** व **कलकत्त्यांत** दंगली झाल्या. ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या चळवळींवर दडपण आणले गेले व हिंदूंच्या चळवळींना प्रोत्साहन दिलें गेलें. आसाम व नागालॅण्डमध्यें जो असंतोष आहे त्याच्या मागें ख्रिश्चनांना ही जी वागणूक दिली जाते तीच कारण आहे. काश्मीरमधील जनतेच्या खऱ्या आकांक्षा दडपून टाकण्यांत येतात यावरून हें स्पष्ट होते कीं, भारतांत शिख, मुसलमान व ख्रिश्चन अल्पसंख्यांकाचे जीवन धोक्यांत आहे. विशेषत: शिखांच्या बाबतींत राष्ट्रीय ऐक्याचे नांवाखालीं शिख जमात नेस्तनाबूत करण्याचा भरपूर प्रयत्न गेल्या १८ वर्षांत झाला. शिखांनीं इतिहास घडविला आणि असल्या प्रयत्नांनीं त्यांचें अस्तित्व नष्ट होणार नाहीं. त्यासाठीं आंतरराष्ट्रीय व स्वतंत्र ट्रिब्यूनल नेमावें. भारत-पाकनें आपले संबंध सुधारावेत म्ह. शिखांना पाकिस्तानांतल्या गुरुद्वारांना भेटी देता येतील व एक राज्य शिखांना मिळावे कीं, जथें त्यांना मुक्तपणें श्वास घेतां येईल.

हें सारें निवेदन मुद्दाम दिले आहे. ते स्वत:च बोलके आहे. 'विभक्त' प्रवृत्ती कशा वाढीस लागल्या आहेत हें त्यांतून स्पष्ट होते. ह्या देशाच्या अस्तित्वाचा आणि स्वातंत्र्याचा लढा सारेच लढले, साऱ्यांनींच इतिहासाच्या पानोपानीं रक्तांची अक्षरें लिहिली. मराठ्यांनीं, जाटांनीं, शिखांनीं, पंजाब्यांनीं, बंगाल्यांनीं—साऱ्यांनीं एकत्वानें लढा दिला आणि पार्टिशन' ही एक चमत्कारिक गोष्ट त्यांतून जन्म पावली. ती किती अस्वाभाविक होती ह्याचा प्रत्यय आजही येत आहे. अशा स्थितींत आणखी एका 'कम्यूनल' राज्याची मागणी शिख करीत आहेत, त्यासाठीं मास्टरजी सत्याचे धिडवडे काढायला तयार आहेत. शिखांचा इतिहास हा हिंदूंच्या इतिहासाशीं संलग्न आहे. भिन्न नाहीं. **'मिलिटंट हिदुत्व'** जगविण्यासाठींच तर शिख पंथ अवतरला. आणि आतां मास्टरजी मुळावरच कुऱ्हाडीचे वार घालीत आहेत. मास्टरजींच्या मुलाखतींत विखार, विघटनेची बीजें जास्त आहेत. पण आज सर्वत्र 'पार्टिशन'चें वारे संचारलें आहे. त्याला तोंड देणें कर्तव्य ठरतें.

**—सारस्वत**







अनुक्रमणिका



दीपावलीचीं

# स न्मा न पु ष्पें

## 'कॉस्मॉपॉलिटन' सदोबा पाटील

**कॉस्मॉपॉलिटन** मुंबईचे, कॉस्मॉपॉलिटन वृत्तीचे व त्याबद्दल सदैव अभिमान वाळगणारे, दिल्लींत राहूनही एक पाय (व सारें लक्ष) मुंबईंत असलेले, मुंबईच्या राजकीय, सामाजिक, नागरी जीवनाशीं समरस झालेले नामदार स. का. पाटील हे ६५ वर्षांचे झाले म्हणून त्यांचा नुकताच सत्कार करण्यांत आला. पाटलांचे सारे राजकीय कर्तृत्व मुंबईंतच घडले, मुंबईनें तें पाहिलें. त्यांचे नेतृत्व ते मुंबईंत असेपर्यंत मुंबई कांग्रेसनें मानलेही ! सरदार पटेलांचा जसा संघटनेवर, संघटना कार्यावर भर होता. तिच्यावरची पकड जशी त्यांनीं कधीं ढिली होऊं दिली नाहीं, तशीच दृष्टि पाटलांजवळ आहे. पटेलांवर पाटलांची फार श्रद्धा होती. त्यामुळें तोच संघटनाविषयक वारसा त्यांनीं चालविला. आजही मुंबई कांग्रेस पाटलांच्या मार्गदर्शनाचा लाभ घेतेच ! पाटलांची संयुक्त महाराष्ट्र, गोवा वगैरे प्रश्नांवरची भूमिका ही 'मराठी' मनाला पटली नाहीं, अनाकलनीय वाटली. म्हणून 'मराठी' माणूस असूनही पाटील मनांतून उतरले. पण पाटलांच्या कर्तृत्वाबद्दल कुणालाही शंका नाहीं. 'सार्वजनिक' जीवनाशी गेलीं तीस चाळीस वर्षे पाटील एकरूप झाले आहेत. पाटील दिल्लीला गेले खरे, पण पंडितजींच्या तोंडावर कटु बोलणारी माणसें त्यांना प्रिय नसत. पाटील तसे आहेत. त्यामुळें पाटील निष्ठेनें काम करीत असले, तरी पाटील हे तिथें अजूनही फार मोठे ठरले नाहींत. वस्तुतः त्यांचें कर्तृत्व मोठें आहे. वृत्ति व दृष्टि वास्तवावर भर देणारी आहे. नेतृत्वाचे सर्व गुण आहेत. ह्या साऱ्याच उपयोग देशाला होणें आवश्यक आहे. संघटनात्मक तडे सांधण्यासाठीं व संघटना बलशाली करण्यासाठीं पाटलांचा वारंवार उपयोग झाला आहे. 'निवडणुक' हे पाटलांचे खास 'फील्ड्' ! अशा बहुरंगी गुणांनीं युक्त असे पाटील आज ६५ व्या वर्षांत पदार्पण करीत आहेत. प्रौढत्वीं निज (वृत्तीचे) शैशव पाटलांनीं जपलें आहे. आणि म्हणूनच ते उत्साही आहेत. त्या उत्साही पाटलांचे अभिनंदन !!

## "मार्मिक" ठाकरे

**कांहीं** घरांत माणसें 'सूर' घेऊन येतात. कांहीं माणसें 'शब्दां'चे स्वामी बनून येतात. कांहींना ताल गवसतो तर कांहींना 'नादां'चे वेड असतें. कांहींना रंगाचा छंद असतो तर कांहीं घरांत रूपाचें सौंदर्य उधळीत माणसें दुनियेंत येतात. कांहींच्या घरांत 'विद्या' वरसते, तर कांहीं घराणीं ओळखलीं जातात त्यांच्या पराक्रमामुळें ! ठाकरे यांच्या घरीं 'पत्रकर्तृत्व' जन्मले असले पाहिजे. पत्रकर्तृत्वाची ग्वाही फक्त शब्दच देतात असें नाहीं. कधीं कधीं ती ग्वाही रेषा देऊन जातात, चित्रें देऊन जातात. एखादी सुंदरशी चार ओळींची कविता देऊन जाते. एखादे लहानसें स्फुट, एखादा परिच्छेद, कांहीं सुंदर वाक्यें देऊन जातात. आणि मग नांव राहते त्या यशाची ग्वाही देत ! 'प्रबोधन'कार ठाकरे यांच्या घरांत त्यांनीं लेखणी चालविली. तलवारीसारखी चालविली तिखट प्रहार करीत चालविली. जनजागरणाच्या निष्ठेनें चालविली कांहीं वेळां ती लौकिक अर्थानें रांगडेपणोनेंही चालविली. पण दीर्घकाळ कर्तृत्व न गाजवूनही आज ठाकरे ठाऊक आहेत ते '**प्रबोधनकार**' म्हणूनच ! त्याच पत्र परंपरेंत दोन सुपुत्र उभे राहिले. **बाळ** आणि **श्रीकान्त** ठाकरे ! मोठ्या ठाकऱ्यांनीं लेखणी चालविली—दोघां ठाकऱ्यांनीं कुंचला चालविला. लेखणीही जर तलवारीचे वार करूं शकत असेल तर कुंचलाही तें कार्य तितक्याच, किंबहुना त्याहून अधिक प्रभावीपणें करूं शकतो हें ठाकरे बंधूंनीं सिद्ध केलें आहे. ठाकरे ह्यांनीं 'व्यंगचित्रकार' म्हणून नांव कमावले, नवशक्ति, फ्रीप्रेसचे व्यंगचित्रकार असतांना ठाकरे यांचा आणि माझा परिचय झाला. सडपातळ शरीराचा, सांवळ्या वर्णाचा, नाकेला, हातांत कुंचला आणि सिगरेट सारखी खेळवणारा, व्यंगचित्रकाराला अत्यावश्यक असलेल्या विनोदी व व्यंगात्मक बोलण्यानें संपादक मंडळांतील सदस्यांत लोकप्रिय असलेले ठाकरे मी जवळून पाहिले ते तिथेंच ! स्वयंकर्तृत्वावर श्रद्धा असलेलीं माणसें नोकरींत कुचंबतात त्यांना कांहींतरी कुठेंतरी कमी आहे असें वाटत राहते. ठाकऱ्यांच्या बाबतींत असेंच झालें असावें. त्यांनीं नवशक्ति सोडली, मग स्वतःच्या व अन्य सहकाऱ्यांच्या मदतीनें एक इंग्रजी दैनिक काढले. परंतु मनांत स्वप्न होते व्यंगचित्र साप्ताहिकाचें ! आणि तें त्यांनीं साकार केलें. '**मार्मिक**' ह्या नांवानें मराठींत प्रथमच व्यंगचित्र साप्ताहिकाचा जन्म झाला मार्मिक हा एक नवा प्रयोग होता. पण आतां मराठी वाचकानें त्याला पसंतीची पावती दिली आहे. ठाकरे यांच्या (दोघांही) कुंचल्यांत सहजता आहे. थोडक्यांत मोठा आशय व्यक्त करण्याची शक्ति आहे. रेषा बोलक्या आहेत. विषयांत कल्पकता व 'मार्मिक'ता आहे. शब्दकोडे, अत्रे हे विषय मार्मिकनें गाजवलेले विषय ! युकॅरिस्ट कांग्रेस, रत्नागिरी एज्युकेशन सोसायटी, पाकविषयक धोरण वगैरे विषयही गाजले. पण ह्या साऱ्यांपेक्षांही मार्मिक ध्यानांत राहील तो त्या बोलक्या रेषांमुळें ! पत्रकाराला आवश्यक असलेली जागरुकता, मर्मभेदी दृष्टि मार्मिकजवळ आहे. परवां गृहमंत्री बाळासाहेब देसाई म्हणाले कीं, राज्यकर्ते चुकत असतील तेथें त्यांच्या चुका अवश्यमेव दाखवा. पण जे बरोबर करीत असतील त्याबद्दल पाठ थोपटायलाही विसरूं नका !" 'मार्मिक'च्या वाढदिवशीं त्यांनीं ही सूचना निःसंशय महत्वाची आहे. त्यामुळें एकतर्फी अन्याय टळेल. ठाकरे आतां व्याख्यानेंही देऊं लागले आहेत. (संपादक झाल्यावर ह्या गोष्टी हळूहळू चालत येतातच नाहीं कां ?) कुठें कुठें अध्यक्ष म्हणूनही जातात. पण मूळ भूमिकाच लोकांच्या अधिक ध्यानांत आहे. आम्हांला 'व्यंगचित्रकार' ठाकरे अधिक आवडतात. 'मार्मिक' आवडते. पहिलें यशस्वी व्यंगचित्र साप्ताहिक म्हणून आम्हीं त्याला सुयश चिंतितो.

—आदित्य

# फुलें–शोभेची (च केवळ) नव्हेत, सुवासिकही !

**संथ** गतीनें पण अतिशय प्रसन्न व आकर्षक शैलीनें कथालेखन करणाऱ्या कथा-लेखकांपैकी श्री. **अच्युत बर्वे** ह्यांचा आवर्जून उल्लेख करायला हवा. त्यांच्या लेखनाचें सारे सौंदर्य त्यांच्या लेखनविषयक भूमिकेंतून आलें आहे. "**इतक्या इतक्या कथा आतां पाडल्याच पाहिजेत**" असा गणिती धोशा त्यांनीं आपल्या लेखनामागें कधीं लावून घेतला नाहीं. "लेखन हा आनंद देणारा माझा छंद आहे आणि त्यामुळें तो आनंद देईल ह्याच दृष्टीनें मी पुरवून घेतो" अशी भूमिका असल्यानें त्यांची कथा नेहमींच प्रसन्न, ताजी, मनाला खुलवून जाणारी अशी झाली आहे. विविध अनुभवांकडे पाहतांनाही मनाची हीच प्रसन्नता बर्वे कायम राखतात त्यामुळें त्यांच्या कथेंत कुठेंही 'मेलोड्रामा' वा नाटकी उसासे येत नाहींत आणि तरीही त्या कथा जीवनाला जवळून स्पर्श करून जातात. मनाला मोहवितात.

**शोभेची फुलें** हा अच्युत बर्वे यांचा सहावा कथासंग्रह पुण्याच्या '**मेनका प्रकाशन**'नें प्रसिद्ध केला असून त्या संग्रहांत बर्वे यांच्या एकूण **नऊ** कथा संग्रहित करण्यांत आल्या आहेत. त्या कथा पूर्वी मासिकांतून आल्या तेव्हां वाचलेल्या होत्या तरीही त्यांचें पुनर्वाचन तितकेंच समाधान-कारक व 'फ्रेश' ताजें वाटलें हें प्रथमच नमूद करतो. दुसरा एक विशेष मला जाणवला तो असा कीं, ह्या कथांत बर्वे ह्यांनीं जीवनाचे अगदीं निरनिराळे भावानुभव चित्रित केले आहेत. अन्यथा बर्वे ह्यांच्या कथा-लेखनाबद्दल कांहीं टीकाकारांचा जो आक्षेप आहे त्याला ह्या कथांनीं उत्तर दिलें नसतें. बर्वे ह्यांच्या लेखनांत स्त्री-पुरुष संबंधांतला एक विशेष भाग विशेषपणें येत राहतो हा तो आक्षेप ! परंतु ह्या संग्रहांतल्या कथांचीं विविध रूपें पाहिला तर बर्वे यांजवरचा आक्षेप खोटा पडेल. स्त्री-पुरुष संबंध हा साहित्याचा सनातन विषय ! पण त्यांतल्या नाजुक भावच्छटा लेखक किती समर्थपणें रंगवूं शकतो ह्यावर त्याचें मोठेपण वा लहानपण ठरत असते. बर्वे यांच्या प्रस्तुत संग्रहांतल्या **बकुळेचें निर्माल्य, वर्तुळातले कोन, शोभेची फुलें, वावटळ, स्वभाव** ह्या कथांत स्त्री आली आहे. पण प्रत्येक कथेचें 'बीज' वेगळे आहे. जात वेगळी आहे. संदर्भ वेगळे आहेत. **बकुळीचें निर्माल्य** ह्या कथेंत स्त्रीची दोन भिन्न रूपें दिसतात. पत्नी आणि प्रेयसी ! 'प्रेयसी' हें रूप मोठें आकर्षक असले तरी शेवटीं मनानें मोठी पत्नीच त्यांतल्या नायकाला मोहविते.




☆ ☆ **शोभेचीं फुलें** ☆ ☆

**शोभेची फुलें** ह्या कथेंतला अनुभव मनोज्ञ आहे. लेखकाच्या लेखनावर खूप असलेली एक विवाहित स्त्री त्याला मोठ्या श्रद्धेनें, जिव्हाळ्यानें भेटायला येते. योगायोग असा कीं, त्याला ती सांगून जाणार होती. परंतु तेवढ्यांत त्याचें लग्न ठरतें. पण आवडता लेखक म्हणून ती त्याला भेटते. तिच्या त्या श्रद्धांना तडा जातो. कारण लेखक तिच्या **भवनांबद्दल गैरसमज** करून घेतो. शेवटीं ती त्याला शेवटच्या भेटींत सांगते कीं, लेखक म्हणून मला तुम्हीं आवडत असला तरी माझं माणूस म्हणून खास आवडला नसता बर्वे यांनीं ह्या कथेंतल्या लेखकाची प्रतिक्रिया थोड्या शब्दांत पण कलात्मक रीतीनें व्यक्त केली आहे. तो म्हणतो, 'समुद्रकांठीं मी एवढा मोकळचावर बसलो होतो आणि तरीही माझं शरीर घामानें डबडबून येत होतं. फार नाजुक विषयावर हळुवारपणें, उत्कंठा वाढवीत बर्वे यांनीं ही कथा लिहिली आहे.

"**वावटळ**" ह्या कथेंतही स्त्री-पुरुषांच्या मनांतला मनुष्य आणि सैतान ह्यांतल्या संघर्षाचीं आंदोलनें चांगली चित्रित केलीं आहेत. लहानशीच कथा आहे. पण माणसाच्या मनांची ओळख सूक्ष्मतेनें पटवणारी आहे. '**स्वभाव**' ह्या कथेंतली 'आई' मला फार मजेशीर वाटली. आपल्या जवळचा 'पैसाही' ही बाई सोडायला तयार नसते. राणी छाप, गोटा छाप रुपये जमवायचे हाच तिचा छंद ! त्या पायीं अगदीं जीव टाकण्या-इतका ! गांठचेच येईल मदतीला अशी तिची श्रद्धा असते. नवऱ्याला कांहीं तिच्या हयातींत तिच्या तांब्यांतले पैसे हातीं येत नाहींत. मुलाला गरजेलासुद्धां ती बाई पैसे देत नाहीं. मुलगा नौकरीला लागतो. त्याच्या पगारांतला आपला वांटा ती काढून घेते. तांब्यांत भर पडते. पण तिची तक्रार मात्र आहे कीं, हल्लींचे रुपये चांगलें वाजत नाहींत ! ही कथा मी 'सजीव' झालेली अनुभविली. चित्रण चित्रांकन करण्या-इतके समर्थ ! माणूस, धार, चक्र, वर्तुळांतले कोन, समईचा थरथरता प्रकाश ह्या कथांतून माणसाच्या मनाची विविध आंदोलनें बर्वे ह्यांनीं रेखाटलीं आहेत. तींही हळुवार-पणें ! माणूस, समईचा प्रकाश ह्या कथांत मनांतल्या कल्पनांना, स्वप्नांना कुठेंतरी तडा जातो आणि माणूस आवेगानें ती पोकळी भरून काढण्यासाठीं त्याच्या मूळ अवस्थेकडे धांवतो. वर्तुळांतले कोन मधली आंदोलनें, प्रतिष्ठेसंबंधींच्या कल्पनांना धक्का बसलेला माणसाला कसा चालत नाहीं, माणसांतला ६१० वगैरे गोष्टी नाजुकपणें रंगविल्या आहेत. बर्वे यांच्या लेखनशैलींतच एक प्रकारची मोहकता आहे. 'मंत्र'मध्यें रेसच्या पार्श्वभूमीचा फार प्रत्यकारी उपयोग केला आहे. कथेंतील माणसें सडली कुजलेली वा विकृत नाही ती असामान्यतेचा दावाही करीत नाहींत तीआहेत माणसें– पडणारीं–पुन्हां उभीं राहणरीं ! कांहीं मूल्यें मानणारीं !' 'जीवना'कडे अधिक वास्तव भूमिकेंतून पाहणारी! आणि त्यामुळेंच तुम्हां आम्हांला आवडणारीं अशी ! मुखपृष्ठ चित्रकार दलालांचे आहे. आकर्षक, अन्वर्थक आहे. मलपृष्ठावरची सचित्र परिचयाची पद्धत मला आवडली. बर्व्यांच्या फोटोचा 'ले आऊट' फारच चांगला आहे.

**–प्रभाकर अत्रे**

[ **शोभेचीं फुलें** – ले. **अच्युत बर्वे**
मेनका प्रकाशन, पुणें २
मूल्य–४ रु. ]

**(पष्ठ १० वरून–जीवनाची सरगम)**

कांचेच्या तुकड्यांतील एखाद्या ठिकाणांहून भिंगासारखी क्रिया होऊन, रात्रीची जागरणं व सततचा अभ्यास यामुळें अगोदरच क्षीण झालेल्या मज्जापटलावर, सूर्यकिरणें एकत्रित झाल्यामुळें मज्जापटल निकामी होऊन हें अंधत्व आलं असावं, हेंच निदान अखेरीस करण्यांत आले.

महिन्या दोन महिन्यांच्या उपचारानंतरहि दृष्टींत कांहींच सुधारणा न झाल्यामुळें कुसुम निराश झाली होती. आपलें अंधत्व ही क्षणिक बाब आहे हा विचार तिनें मनांतून काढून टाकला होता व आपले अंधत्व तिनें स्वीकारलें

होते. पण तिला निराश होण्यास अजून एक कारण घडले होते. सुरुवातीला अधुन मधुन तिला भेटून जाणारा मनोहर आतांशा तिच्याकडे येण्याचं टाळूं लागला होता. आंधळ्या कुसुमचा स्वीकार करावयास तो तयार नव्हता हेंच त्यांतून सूचित होत होते. त्यामुळें जीवनाविषयीं ती अधिकच उदासीन झाली होती. देहाच्या या अवस्थेत तिला मनोहरचा मोठा आसरा वाटत होता, तोच तुटला होता. तिच्या अंधत्वामुळें त्याच्या प्रेमांतील उत्कटतेच्या अभावाचा प्रत्यय आला हेंच काय कमी होतं ?

मुंबईहून परत आल्यावर तिला कळलं कीं, मनोहरचा विवाह झाला. जणूं तिच्यापासून सुटका करून घेण्यासाठीं घाईतच त्यानें लग्न उरकलें होते !

मनोहरशी असलेले बंधन असें पूर्णपणें तुटल्यावर निःसंगपणें आयुष्य व्यतीत करण्यास तिनें सुरुवात केली. आपल्या खोलींत तास न् तास स्वतःला कोंडून घेऊन ती गात बसायची. तेवढेंच एक विसाव्याचें स्थान तिच्या आयुष्यांत उरलेलें होते. अधूनमधून मंदा तिला मोटारींतून दूरवर हिंडायला न्यायची. कधीं अंबाझरीवर तर कधीं तेलंखेडीच्या बगिच्यांत. तेथें त्या दोघी खूप वेळ बोलत बसायच्या. एकदां त्या अशाच बोलत असतांना एकदमच कुसुमनें तिला विचारलें, "मंदा, मी जन्मभर अशीच एकटीच राहणार कां ग ? तुझं लग्न झालं कीं, तूं निघून जाशील ? मी मात्र बाबांची जन्माची जबाबदारी होऊन घरी पडून राहीन."

तिच्या बोलण्यानें मंदा गोंधळून गेली. कोणत्या शब्दांनीं तिला दिलासा द्यावा हें तिला समजेना. समजावणीच्या स्वरांत ती म्हणाली, "असं कां म्हणतेस ताई ? एक मनोहर असें निघाले म्हणून सगळेच पुरुष याच विचाराचे निघतील असं कां समजायचं ?"

पण ती असं म्हणाली तरी तिचा स्वतःचाच त्या शब्दांवर विश्वास बसत नव्हता. क्षुल्लक कारणांसाठीं तिच्या मैत्रिणींची लग्नं लांबणीवर पडलेली तिनें पाहिली होती. इथें तर एका आंधळीशी लग्न करण्याचा प्रश्न होता !

मंदाच्या बोलण्यावर कुसुम हंसली. म्हणाली, "कशाला माझं कोरडं समाधान करतेस ? वस्तुस्थिती विसरून तूं बोललीस तरी तसं करून मला चालायचं नाहीं. मी तरी वेड्यासारखं तुला काय विचारीत बसलें !"

मग विषय बदलीत ती म्हणाली, "बाबांनीं उद्यांचा कार्यक्रम माझ्यावर उगीचच लादला आहे."

"अरे हो, तुझा गाण्याचा कार्यक्रम उद्यांवरच आला नाहीं कां ? काय म्हणणार आहेस तूं ?" मंदा म्हणाली. तिला या कार्यक्रमाचा विसरच पडल्यासारखें झालें होतें.

"कुणास ठाऊक ? माझं मलाच माहीत नाहीं मी काय गाणार आहे ते," कुसुम म्हणाली.

केवळ तिच्या बाबांसाठीं ती या गाण्याच्या कार्यक्रमाला तयार झाली होती. अंधशाळेचे ट्रस्टी तिच्या बाबांचे मित्र होते. त्यांनीं आग्रह केल्यामुळें तिला न विचारतांच बाबांनीं होकार दिला होता. कार्यक्रम अंध मुलांच्या मदतीसाठीं होता. स्वतः अंध असूनही अंधांसाठीं आ[illegible]ण कांहींतरी करूं शकतो याचें सूक्ष्म [illegible]माधान त्यामागें होते. त्यासाठींच ती कार्यक्रम देण्यासाठीं तयार झाली होती.

दुसऱ्या दिवशीचा कार्यक्रम अपेक्षेबाहेर यशस्वी झाला. "मी तर प्रेम दिवाणी, माझे दुःख न जाणे कोणी', या तिच्या पहिल्याच गीतानें टाळ्या घेतल्या. त्या गाण्यानें तिनें कार्यक्रमावर जी पकड घेतली ती शेवटपर्यंत कांहीं सोडली नाहीं. श्रोते मंत्रमुग्ध होऊन तिचें गाणें ऐकत होते व आपण आंधळे आहोत हें विसरून तन्मयतेनें ती गात होती.

गाणें संपल्यावर टाळ्यांचा जो प्रचंड कडकडाट झाला त्यानें ती हरखून गेली व तिचे अभिनंदन करण्यासाठीं जेव्हा लोक आंत आले तेव्हां प्रत्येकाबरोबर बोलतांना व प्रत्येकाचें आभार मानतांना ती दमून गेली. तिचें डोळे गेल्यापासून उत्कट आनंदाचे क्षण ती प्रथमच उपभोगीत होती.

तो कार्यक्रम झाल्याच्या दुसऱ्या दिवशीं ती आपल्या बाबांबरोबर दिवाणखान्यांत बोलत बसली होती. काल ज्या उत्कट आनंदाचा अनुभव तिनें घेतला त्या सगळ्या प्रसंगांची उजळणी करून पुनः प्रत्ययाचा अनुभव ती घेत होती.

तेवढ्यांत घंटीचा आवाज झाला. नोकरानें पुढें होऊन दार उघडलें. दार उघडतांच एक तरुण आंत आला व त्यानें त्या दोघांना अभिवादन केले.

"माफ करा हं, मी तुमच्या बोलण्यांत व्यत्यय तर नाहीं ना आणला," तो तरुण म्हणाला, "माझं नांव नागेश जोशी. भारतीय सैन्यांत मी मेजर आहे."

"या, बसा ना. काय काम होतं !" बाबा म्हणाले.

कुसुमकडे बोट दाखवीत नागेश म्हणाला, "मी यांचं अभिनंदन करायला आलो होतो. कालचा यांचा गाण्याचा कार्यक्रम फार अप्रतिम झाला. इतकं गोड, भावपूर्ण [illegible] आतापर्यंत मी कधीं ऐकलं नव्ह[illegible]. [illegible] वेळ थांबवून तो म्हणाला, "आणि जे[illegible] मला कळलं कीं, यांची दृष्टि गेलेली आहे–"

त्याने तिच्या डोळ्यांचा उल्लेख करतांच कुसुम दुखावली. "आपल्या अभिनंदनाबद्दल मी आपली आभारी आहे," उठून उभी होत ती म्हणाली, "तुमचं माझ्याशी असलेलं काम संपलं असेल तर मी आपली परवानगी घेते."

"छे, छे, आपण अशा जाऊं नका. तुम्हांला दुखवायचा माझा मुळींच विचार नव्हता," नागेश तिला सम[illegible]वीत म्हणाला.

मग बाबांकडे वळून तो म्हणाला, "म[illegible] आपल्याला एक विनंती करायची आहे. मी हें एक धाडसच करतो आहे. आपण रागावणार तर नाहीं ना ?"

"आपल्याला काय हवं हे कळल्यावरच रागावायचं कीं, नाहीं ते बघूं," बाबा म्हणाले.

नागेशच्या व्यक्तिमत्वानें ते प्रभावीत झाले होते. दिसायला लाघवी पण कणखर असे व्यक्तिमत्व त्याच्या ठायीं असल्याचें त्यांच्या प्रत्ययास आले. या नवख्या तरुणाचें आपल्याकडे काय काम असावें हेंच त्यांना कळत नव्हते.

"मी ह्यांना मागणी घालायला आलो आहे," कुसुमकडे अंगुली निर्देश करीत नागेश म्हणाला, "हें थोडंसं विचित्रच वाटेल तुम्हाला, पण ह्यांच्यासारखी पत्नी मला लाभली तर मी स्वतःला खरोखर भाग्यवान् समजेन."

त्या नवख्या तरुणाच्या अनपेक्षित मागणीनें दोघांनाहि काय बोलावं ते सुचेना. कुसुमचा तर आपल्या कानांवर विश्वासच बसेना. आपले लग्न ही बाब तिनें [illegible]पल्या मनांतून काढून टाकली होती आणि यावेळीं एक तरुण तिला मागणी घालीत होता. तो चांगल्या हुद्यावर होता तरीपण तो तिची अपेक्षा करीत होता. ती आंधळी आहे हें त्याला ठाऊक असून तो तिला पत्नी करण्यासाठीं उत्सुक होता. तो रूपानें कसा आहे हें तिला दिसत नव्हतं तरी त्याचं मन मोठं आहे याचा प्रत्यय मात्र तिला येत होता.

नागेश स्वतःविषयीं, स्वतःच्या कुटुंबाविषयीं माहिती देत होता. त्याची ही मागणी त्यांनीं अव्हेरू नये असं वारंवार सांगत होता––

–आणि कुसुमच्या कानांत सनईचे स्वर घुमायला लागले होते ! ●●●







अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




